


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका






वर्षारंभ

हास्य–विनोद

विशेषांक




वर्ष २३ वे • मार्च १९६७ • मूल्य १॥ रु.

# दीपावली

साहित्य-कला-सङ्गम

## श्रे य ना मा व लि–

आमची अलिबागची सफर. . .स्मग्लिंगचे थ्रिल्. . .**जयवंत दळवी** • नभोवाणीवर जाहिराती. . . 'माल गळ्यात बांधणे'...**रमेश मंत्री** • बाबल्या सरणावरून पळाला...एक मुलुखावेगळी स्मशानयात्रा...**वसंत सबनीस** • वृद्धाश्रम... एक नवा आश्रम. . . .**पद्‌माकर गोवईकर** • आम्हीही सुंदर झालो असतो. . . .छे_ छे ! ! आमच्या हातून असले भलतेच होणे नाही–**ह. शि. खरात** • अश्रूंचे आखात. . . .दर्यावर्दी जीवनाची झलक–**रि. ॲड. करमरकर** • भाग्याची गोष्ट. . .'अजागळी' शेवटी पाळणा हलला नाही. . . .**वा. रा. सोनार** • वासू धंद्यात पडतो. . . . वासूची नाक्यावरून कोलांटी. . .**डॉ. बाळ गांगल** • वॉल्ट डिस्नी. . . .प्रति-विश्वामित्राचे आगळे दर्शन. . . **दा. गो. देशपांडे** • आणि 'विलेक्शन भर्कटिका'–**ह. शि. खरात** • शिवाय दिवाळी अंकांतील विनोदी लेखन... **शां. शं. रेगे** [आकाशवाणीच्या सौजन्याने]; व्यंगचित्रे–हास्य-स्फोटक; सन्मान पुष्पे, दीपमाला.

दलाल आर्ट स्टुडिओ . ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४

Gram : Dalalart
टे. नं. ३५७७६५

• संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक श्री. **दीनानाथ दलाल,** दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. या प्रतीस किंमत १।। रु. + रजि. पोस्ट ५५ पैसे. वार्षिक वर्गणी, दिवाळी अंकास रु. १२।।. अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें ही चालकांचीहि अधिकृत मतें असतातच असें नाहीं.

Registered with the Registrar of Newspapers For India under No. RN 1612/57
DIPAVALI : Dalal Art Studio, 40-42, Kennedy Bridge, Bombay -4

अनुक्रमणिका




# शेवटी—
## ही धुंदी कलानंदाची




**दलाल आर्ट स्टुडिओ**
४२, केनेडी ब्रीज, मुंबई, ४,
टेलिफोन : ३५७७६५. ★ तारेचा पत्ता DALALART

● **वर्गणीदारास सूचना :** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० पैसे. द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रवार्षिक वर्गणी रु.२५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशी वार्षिक वर्गणी १६–००**

● **वर्गणी** मनिऑर्डरनें द्यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नांवें, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होता येतें.

● **अंक न पोचल्याचें** कळवावयाचें झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफिसमध्यें शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यांत येते. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमी–जास्त फरक झाला तर त्याची जवाबदारी व्यवस्थापकावर नाहीं.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरांत सामान्यतः कळविला जातो. पोस्टेज असलेलें नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसे पोस्टेज नसल्यास तें निकालांत काढलें जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झालें तर त्याची जवाबदारी व्यवस्थापकावर नाहीं.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल** यांनीं स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमि भवन, घोगा स्ट्रीट, फोर्ट, मुंबई १ येथें छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.

'दीपावली'चा हा तेवीसावा वाढदिवस! वाढदिवस म्हटलं की, आनंद आला. अभिमान आला. समाधान आले. मागे वळून पाहणे आले. पुढली मनोहर स्वप्ने पाहणे आले. त्या स्वप्नांच्या पूर्तीसाठी कराव्या लागणाऱ्या साधनेचे संकल्प आले. कठोर आत्मपरीक्षण आले. आत्मपरीक्षण यासाठी की कुठल्याही प्रवासात असले आत्मपरीक्षण प्रगतीची दिशा दाखवीत असते. आत्मपरीक्षण संपले की शोध संपला. आणि शोध संपला की प्रगतीचा प्रवासही संपला अशीच श्रद्धा 'दीपावली' बाळगीत आली आहे. पुढचा रस्ता स्वच्छ दिसतो आहे. काही रमणीय स्वप्ने समोर नाचताहेत. काही 'दिव्य-भास' मनाला साद घालताहेत. केलेली साधना निराशाजनक नसल्याने मन काहीसे तृप्त आहे. वाढदिवसाचा आनंद मनात नाचतो तो ह्या भावनेतूनच. पण हा आनंद आमचा एकट्याचा नाही, आपणा साऱ्यांचा आहे. आम्ही एकटे हसलो तर वेडे ठरू. सारे मिळून हसलो तर स्वर्ग घरेवर येईल. हास्याने हास्य फुलते.

आनंदातून हास्य आणि हास्यातून स्वर्गीय आनंदाची निर्मिती होत असते. 'दीपावली'च्या वाढदिवशी हा हास्याचा सामुदायिक सोहळा साजरा करण्याची पद्धत आम्ही स्वीकारली ती ह्या भावनेनेच! "तुम्ही हसलात तर सारे जग तुमच्याबरोबर हसेल, रडलात तर मात्र तुम्ही एकटेच रडणारे असाल" अशा अर्थाची एक इंग्रजी म्हण आहे. आम्हाला ती पटली आहे. म्हणून ह्या हास्य-सोहळ्यात आम्ही आपणास सहभागी करून घेत आहोत! 'हास्य-विनोद अंका'ची पद्धत जन्मली त्याच भावनेतून! हा अंक मराठीच्या अग्रगण्य अशा विनोदकारानी सजवला आहे. ती 'सजावट' पहात आम्ही भरपूर हसलो आहोत. तुम्हीही हसणार आहात. हसा. भरपूर हसा आणि इतरही इष्ट मित्र (मैत्रिणीनाही) बरोबर घेऊन हसा. आनंद दिल्याने वाढतो. हे वाढते 'दान' असते. हा वाढता 'वसा' आम्ही आपल्या हाती देत आहोत. घरोघर पोहचवा.

आता आम्ही जरा मागे वळून पाहतो. स्वतःसाठी आणि तुमच्यासाठीही! कलेच्या आणि जीवनाच्या प्रवासात हे असं पाहणं 'धर्म्य' मानलं जातं. (एरव्ही हेतूबद्दल संशय घेतला जाण्याची भीति असते) मागला वर्षारंभ अंक आंतरराष्ट्रीय विनोद विशेषांक म्हणून आम्ही सादर केला होता, त्यानंतरच्या वर्षात 'संगीत विशेषांकाचा' आणि 'अजून विशेषांकाचा' नवा प्रयोग दीपावलीने केला. ह्या दोन्ही अंकांचे रसिकांनी चांगले स्वागत केले हे मुद्दाम नमूद करतो. "अंदमान ते आनंदमान" ही श्री. माधव राजवाडे यांची "कायाकल्प-कथा" अशीच गाजली. तिच्या आगळ्या स्वरुपामुळे तिने रसिक-मानसात मानाचे स्थान पटकावले. "नौदल-विशेषांक" 'क्रिकेट पुरवणी', संगीत अंक, केशवसुत पुरवणी ही त्याची 'चोख' उत्तरे होत. "आम्ही असे लिहितो" ह्या गतवर्षी सुरू केलेल्या मुलाखत मालेत यंदाचे वर्षी प्रा. वामन चोरघडे, मो. ग. रांगणेकर, बा. भ. बोरकर ह्यांच्या मुलाखती आम्ही सादर केल्या. त्या मुलाखतींनी बऱ्याचशा साहित्य-रसिकांना समाधान दिले. तशी नोंद दप्तरी आहे. एरॉल फ्लिनच्या गाजलेल्या आत्मचरित्राचा परिचयही असाच गाजला. गेल्या वर्षात काही नवे लेखक 'दीपावली'ने सादर केले. "असे पाहिले, असे ऐकले" हे नवे परखड पण खुसखुशीत सदरही रसिक मानसात 'घर' करून आहे. त्यातली मर्मग्राही टीका बड्याबड्यानी विचारार्ह मानली आहे. 'ठणठणपाळ'ही गेल्या वर्षात 'दीपावली'त डोकावून गेले. मराठीत हा प्रकार 'अभिनव' होता. 'दीपावली'चा दिवाळी अंक हा तर मराठीत वर्षानुवर्षे गाजत आहे (असे लोक वर्षानुवर्षे म्हणताहेत). तिथे खांडेकर, पु. भा. भावे, अरविंद गोखले, वामन चोरघडे, यांच्यापासून आजच्या दिलीप चित्रे, नेरुरकरांपर्यंत साऱ्यांनी हजेरी लावली. विद्याधर गोखल्यानी एक नवा प्रयोग सादर केला. साहित्यातील 'चालू नाके' गाजले. रसिकांनी अंक (अक्षरशः) उचलला. ह्या रसिकांच्या कौतुकाने आम्ही भारावून गेलो आहोत. पण रसिक वाचकहो, ह्या आनंदाचे खरे मानकरी तुम्हीच आहात.

संपादक



अनुक्रमणिका

# तुमच्या लाडक्या लेकीच्या लग्नाला आम्ही रु.३०००/- देऊं ...

RAT-BHA/M/65-5

तुम्ही विम्याची पॉलिसी घेतली की ठरविलेल्या रकमेची निश्चिती होते. एकदम रक्कम उभी करण्याऐवजी विम्यामध्यें लहान लहान हप्ते सोयीस्कर रीतीने भरता येतात. दुर्दैवाने आधीच वडिलांचा मृत्यु झाल्यास ठरलेल्यावेळी ठरलेली रक्कम पुढील हप्ते न भरता मिळते. हे फक्त विम्यानेच होऊ शकते. विमा उतरविणे किती सोपे व थोडक्यांत आहे ते पहा. उदा. तुमचे वय ३० असेल आणि लेकीचे २ असेल तर तिच्या लग्नाचें वेळी म्हणजे तिच्या २० व्या वर्षी ३००० रुपये हवे असतील तर दरमहा १२ रुपये विम्याचा हप्ता पडतो. तुमच्या विमाएजंटाचा आजच सल्ला घ्या.



**आयुर्विम्याला** पर्याय नाहीं





अनुक्रमणिका



# आमची अलिबागची सफर

## (दीड दिवसाची) तरीही एक प्रवास-वर्णन

–जयवंत दळवी

**आमच्या** हापिसातल्या परस्पर सहकार्य मंडळाने शेवटी एकदाचा एकमुखी निर्णय घेतला, आणि कुलावा जिल्ह्यातील अलिबाग या गावी फक्त दीड दिवसाची एक सफर काढण्याचे निश्चित केले. तसा हा निर्णय एकमुखी असला, तरी किमान एक मुख असे निघाले, की त्यातून एक विसंवादी सूर उमटला. ते तोंड चिंतामणी ओकाचे ! चिंतामणी ओक हा एक सामान्य टायपिस्ट ! "या जगात असामान्य टायपिस्ट कोण आहे?"– हा त्याचाच प्रश्न ! हा चिंतामणी ओक सारखी चिंता ओकत असतो, असे आमच्या हापिसात विनोदाने म्हटले जाते. आमच्या हापिसातला विनोद हा बहुधा असाच व इतकाच माफक असतो. तथापि मराठीत विनोदकार नाहीत, असेहि मत विनोदी पुस्तके वाचून आम्ही देतो. तर त असो. सांगण्याचा मुद्दा एवढाच की, या चिंतामणी ओकाने सफरीचा निर्णय घेता घेता एक मूलभूत प्रश्न उपस्थित केला. तो म्हणाला, "अशा सफरीने काय साध्य होणार?" वास्तविक त्याचा हा प्रश्न कोणी गंभीरपणे घेता नये होता. कारण त्याच्या (किंवा त्याच्या वडिलांनी म्हणा हवे तर–) त्याचे लग्न बापाने ठरवले, तेव्हा सुद्धा त्याने खुद्द आपल्या बापाला हाच प्रश्न विचारला होता, "तुम्ही म्हणत असाल तर लग्न करतो. पण लग्न करून काय साध्य होणार ?"

त्यावर बिचारा बाप म्हणाला होता, "तू लग्न कर! त्यातून काय साध्य होणार ते पुढे पाहू!"

लग्नानंतर त्याला सासऱ्याने हनीमूनसाठी काश्मीरचे तिकीट काढून दिले. तेव्हा तो काश्मीरला जायला निघाला. त्यावेळी "बा चिंतामणी !प्रत्येक करणीच्या वेळी काय साध्य होणार आहे, हे तू तुझ्या पत्नीला विचारू नकोस. दिवस उलटे आहेत. काही साध्य होऊ नये, म्हणूनच निकराचे प्रयत्न करणे जरुरीचे आहे!" असे परस्पर सहकार्य मंडळाच्या वतीने त्याला बजावण्यात आले होते. तरीहि पुढील चार वर्षात त्याला तीन मुले झाली ! आणि तरीहि काय साध्य होणार, असे विचारण्याची त्याची संवय काही सुटली नाही.

म्हणून अशा सफरीने काय साध्य होणार, हा त्याचा प्रश्न कोणी मनावर घेता कामा नये होता. पण आमचे हापिस असे चमत्कारिक आहे की, ही फाईल अशी कां पडून राहिली ? किंवा हे पत्र टाइप कां झाले नाही?—यासारखे आम्ही विचारलेले प्रश्न कोणी मनावर घेत नाही. आम्ही आपले सारखे प्रश्न विचारीत रहातो. (हेडक्लार्क पडलो ना? दुसरे काय करणार?) पण कोणी ते मनावर घेईल तर शपथ !

चिंतामणी ओकाचा प्रश्न मात्र सर्वांनी झेलला. आमच्या पुढल्या पिढींतील तरुण कारकुनाना थुंकी झेलण्याची संवय नसल्यामुळे,

माडाला नारळ किती लागतात ? मिरचीचे पीक कसे असते ? पोलिसाचा पोषाख म्हणजे नेमके काय ? आणि स्मगलिंगचे थ्रिल् प. स. मंडळाने छत्तीस तासात अनुभवले.... तुम्हाला तसे जमते का पहा........

ते असले काही तरी वरोवर झेलतात.

तर चिंतामणीच्या प्रश्नावर मंडळाचा चिटणीस केशव टाकळे तात्काळ बोलायला उभा राहिला. वास्तविक मंडळाचे अध्यक्ष म्हणून आम्ही उठत होतो. पण खुर्चीवर दुमडून घेतलेले पाय सोडवताना उशीर झाला. (किंचित् संधिवात आहे!) संधि व्याकरणाचे असोत अथवा पायाचे असोत, सोडवताना वेळ लागतोच!

"विटूकाका, तुम्ही स्वस्थ वसा. मी उत्तर देतो." असे म्हणून केशव उभा राहिला. सभा असो किंवा हापिसचे 'अर्जंट फ्लॅग' असलेले काम असो, या केशवाची वडवड करण्याची हौस दांडगी! नुसता दिवसभर काव काव करीत असतो. तो म्हणाला, "वर्षातून एकदा पसमंने सफर काढली नाही तर पसमंने दुसर करायचं तरी काय?"

"चर्चा करा–" ओकाने दात कोरले.

"कामाच्या वेळेत तच चाललय–" आम्ही म्हणालो. पण कुणी लक्ष दिले नाही.

मग टाकळे कमरेवर हात ठेवून भाषण करू लागला. "ग्रंथालय काढलं, पण वाचायला म्हणून नेलेला ग्रंथ परत आला नाही. मासिकं घेतली. त्यांचीहि तीच गत! पसमंला रद्दीचं सुद्धा उत्पन्न नाही."

येथे हेडक्लार्क म्हणून आम्हास स्वस्थ बसवले नाही. स्वस्थ वसल्या वसल्याच आम्ही म्हणालो, "अरे टाकळे, तू ग्रंथांचं आणि मासिकाचं काय घेऊन बसलास? ("मी बसलोय कुठं? उभाच आहे मी!" हा टाकळेचा विनोद. त्यावर निर्लज्ज हंशा! पण टाळ्या नाहीत हे नशीव!) ग्रंथांचं आणि मासिकांचं सोड! त्या तरी निरुपयोगी वस्तु. पण या हापिसातल्या पेन्सिली, कागद, निवा, जाग्यावर रहात नाहीत त्याचं काय?"

आमच्या या सडेतोड वक्तव्यावर काही वेळ गोंधळ माजला. आणि "असले भलते (आणि विशेषत:) सलते प्रश्न भलत्या वेळी उपस्थित करू नका; नाहीतर पसमं वरखास्त होईल!" अशी ओरड झाली. मग आम्ही गप्प राहिलो. कारकुनांनी ओरड केली की, हेडक्लार्कने गप्प वसावे, असा चालू काळाचा गुण आहे. नाही तर लेकाचे 'हापिस वंद' मोहीम काढायचे. चालू काळात 'वंद'ची आवड! काळ तेवढा चालू!

तेवढ्यात "ऐका, ऐका, लोकहो, ऐका!" असे ओरडणे कानी पडले. हा नानूमामा! जेमतेम पांच जणांची सभा...पण हजार वाराशे लोकाना शांत करावयाचे आहे असे समजून तो ओरडला. आणि म्हणाला, "वंधु–भगिनीनो, (भगिनी एकहि नव्हती. आवाज मात्र हजार वाराशे लोकाना पुरेल इतका होता.) सफर ही झालीच पाहिजे. माझ्या स्वानुभवावरून मी आपणास प्रवासाचे महत्व थोडक्यात विशद करून सांगतो." असे म्हणून संवाद विसरलेल्या नटाने विंगेत पाहावे, तसे त्याने क्षणभर आजुबाजून पाहिले आणि मग म्हणाला, "तारुण्याच्या भरात, शक्तीच्या अमदानीत प्रवासासारखी मौज नाही. निरनिराळे प्रदेश, देखावे, नद्या, नाले, डोंगर, झाडे, शहरे, खेडी, माणसे, रीतिभाती नजरेस पडून नूतनपणाची करमणूक मनास होते, व निरनिराळी माहिती होते, शहाणपणा येतो. सुखाची खरी आनंद देण्याची शक्ति काही दुःखाची मिसळ असल्याशिवाय वाहेर पडत नाही. चालण्याने आंग दुखणे, आज जेवावयास न मिळणे, उद्या भर दोन प्रहरी एखाद्या वाभळीच्या विरल छायेत पाणी पाणी करीत वसणे, परवा रात्रीच्या भर थंडीत अरण्यात कुडकुडत पडणे, एखादा जिन्नस विसरणे, थोडीशी भामट्यांची भीति असणे, वगैरे प्रसंगी घडणाऱ्या गोष्टी प्रवासाच्या सुखात मिळून मुखरूपच होऊन जातात."

हे चालू असतानाच त्रिंबक नावर म्हणाला, "नानूमामा, हा तुमचा अनुभव?"

"अलवत्! कां?"

"हा संपूर्ण उतारा गोडसे भटजींच्या 'माझा प्रवास' या पुस्तकात आहे म्हणून म्हणतो!"

**चढेल....**

आम्ही पडलो तर
कोण जिंकेल ?
आम्ही जिंकलो तर
कोण पडेल ?



**गिधाड**

एक गिधाड
निवडणूक लढे
मताच्या पेटीत
कवड्या नि हाडे !

नानूमामा काही बोलला नाही. हसला आणि खाली बसला. अशावेळी दुसऱ्याचा चेहरा गोरामोरा झाला असता. पण नानूमामाचा चेहरा मूळचाच गोरामोरा असल्यामुळे त्याच्या चेहऱ्यात वेगळा फरक पडला नाही.

तेवढ्यात मंडळाच्या ग्रंथालयाचे 'माझा प्रवास' हे गहाळ पुस्तक नावमकरांकडे आहे की नानूमामाकडे आहे याचा केशव टाकळेने शोध सुरू केला. त्यात अडथळा यावा म्हणून गडबड गोंधळातच अलिबागची सफर निश्चित झाली.

सभा बरखास्त होता होता नानूमामा पुनः उठला. तेवढ्यात "आता आणखी कुठला उतारा पाठ म्हणून दाखवणार?" अशी कुणी तरी विचारणा केली. त्याला उत्तर न देता नानूमामा म्हणाला, "आपले सर्वांचे जुने मित्र मास्तर विष्णुपंत दांडेकर (माजी शाळामास्तर, पोस्टमास्तर, स्काऊटमास्तर) सध्या अलिबागेस आहेत. . . ."

हे ऐकताच हवेत हात उडवीत सर्वांनी आनंद व्यक्त केला. दांडेकरमास्तर पूर्वी नगरला असताना सर्वांनी नगरची सफर काढून आकण्ठ पाहुणचार घेतला होता.

"तर तुमच्या अनुमतीने आम्ही शनिवारी अलिबागेस येत आहो असे दांडेकराना कळवतो." असे नानूमामा म्हणाला.

त्यावर "कळवा–कळवा" असे सर्वजण ओरडले आणि पांगले.

तेवढ्यात "कळवा? म्हणजे कळव्याला जायचं की अलिबागेला?" असे विचारून आम्ही खात्री करून घेतली. हेतू थोडा विनोद करण्याचाच होता. पण कोणी हंसले नाहीत. त्याअर्थी उच्च विनोद माथ्यावरून गेला असावा.

उद्या सकाळी बोटीने निघायचे, तर आदल्या रात्री जेवण झाल्यावर नानू आमच्याकडे हजर झाला.

"काय रे नानू?"

"तुझी धाकटी रंगी कुठं?"

"झोपली कां?"

"तिचं भूगोलाचं पुस्तक हवं होतं. ज्या भूप्रदेशात आपण उद्या जायचं, त्याची ओळख करून घेतलेली बरी!"

मी रंगीचे चौथीचे पुस्तक काढून दिले. ते तो मोठ्याने वाचत बसला. तेवढ्यात मी बॅगेत कपडे भरत राहिलो.

नानूने तोंड उघडले, "मुलांनो–"

"झोपली आहेत!"

"झोपू दे! मुलांनो–" तो वाचू लागला, "भारत हा आपला देश. आपण या देशाच्या ज्या भागात रहातो ते महाराष्ट्र राज्य. या राज्याच्या तीन बाजूस जमीन असून पश्चिमेस मात्र अरबी समुद्र आहे. . . ."

येथ नानू गोंधळल्यासारखा दिसला. म्हणून आम्ही विचारले, "काय झाले?"

नानू म्हणाला, "काही तरी गोंधळ आहे. पृथ्वीचा तीन चतुर्थांश भाग पाण्याखाली आहे. आणि एक चतुर्थांश जमीन आहे. मग महाराष्ट्राच्या तीन बाजूस जमीन आणि एका बाजूस पाणी कसं?"

ते ऐकून आम्हीही गोंधळलों. पण नवी कटकट नको म्हणून म्हटले, "असेना! तुझे काय जाते?"

मग तो पुढे वाचू लागला! क्षुल्लक प्रश्न विचारून महत्त्वाचे प्रश्न बाद करता येतात ते असे.

"मुलांनो, आपल्या शेजारची राज्ये कोणती ती शाळेतल्या नकाशात पहा. (आता हा नानू शाळेत जाणार की काय?) आणि शेजारच्या नकाशात भरा."

नानू पुनः गोंधळला. कारण शेजारच्या कोऱ्या नकाशात होल्डॉलमध्ये कपडे भरावेत तशी रंगीने राज्ये भरली होती. काश्मीर तर सीलोनच्या नजीक पाहून नानू पुरता गोंधळला. आणि मग, नकाशात अडकून पडण्यापेक्षा वाचत रहाणे बरे, म्हणून तो पुनः वाचत राहिला.

"आपण महाराष्ट्राचे रहिवासी. आपण बोलतो ती मराठी भाषा."

आम्ही ऐकत राहिलो. कारण माहिती उद्‌बोधक होती.

"सह्याद्री व अरबी समुद्र यांच्यामध्ये असलेली चिंचोळी किनारपट्टी ही आपली कोंकणपट्टी. कोंकणपट्टीतून सह्याद्रीवर चढणे फार कठीण आहे."

"नानू, लक्षात ठेव. आपण सह्याद्रीवर चढणार नाही. कटकट नको." आम्ही आगाऊच बजावून ठेवले आणि ते नानूला पटले.

मग नानू वैतागून म्हणाला, "विटू, पूर्वीचा शिक्षणाचा दर्जा आता राहिला नाही. या भूगोलात कोंकणपट्टी, सह्याद्रि, घाटमाथा सगळी माहिती आहे. पण अलिबाग नेमकं कुठं आहे याची माहिती नाही. आता मला ते माहीत आहे म्हणून बरे!"

"कुठं आहे?"

"कोंकणपट्टीत रे!"

"कोंकणपट्टीत फार उकडते–" तो परत वाचू लागला, "सारखा घाम येतो. हवा फार त्रासदायक वाटते. त्यामुळे लोकरी कपडे तेथे लागत नाहीत."

गरम बंडी आणि मफलर बॅगेत भरता भरता ही माहिती कानावर पडली म्हणून बरे. त्यामुळे बॅगेतले तेवढे वजन कमी करता आले.

"हा पहा रामजी–"

"कुठे?"

[पृष्ठ ५६ वर पहा]

**उडेल !**

कुणी निंदा
कुणी वंदा
टोपी फिरवणे
आमचा धंदा



**बगळा....**

एक बगळा
निवडून आला
'मच्छीमारी'चा
मंत्री झाला !



— रमेश मंत्री

# नभोवाणीवर जाहिराती

विद्यार्थ्यांचा असंतोष, दृष्टिदोष, कर्णदोष, कुटुंब-कलह फार काय अ. अं. उ. (अधिक अंडी उत्पादन)
यासाठी—एकमेव रामबाण उपाय--? म्हणजेच—रेडिओ—जाहिरात—क्रम—कार्यक्रम

**जगात** अशी एकमेव कचेरी आहे. त्या कचेरीत तुम्ही एक सुंदर .रुणी होऊन गेलात, तर दहावीस अधिकारी हातातले काम टाकून, तुम्हाला काय हवे म्हणून चौकशी करायला धांवतील. पण तुम्ही पुरुष असाल, आणि तुम्ही साहित्यावद्दल नोवेल पारितोषक जरी मिळविले असले, तरी तेथे तुमचे स्वागत आंवट चेहऱ्याने आणि कडवट शब्दानेच होईल. ही कचेरी कोणती, ते तुम्ही ओळखलेच असेल. तेव्हा तिचे नांव जाहीर न करता आपल्या विषयाकडे वळू.

विषय असा: रेडिओवर जाहिराती घ्याव्यात की नकोत? अहो हा काय वादाचा विषय आहे? वास्तविक, जे कोणी नभोवाणीचे कार्यक्रम ऐकतात, त्याना हा प्रश्न पडू नये. हे वहुतेक कार्यक्रम इतके वेचव होतात, की त्यापेक्षा जाहिराती तरी थोडी करमणूक करतील, अशी आशा धरायला काहीच हरकत नसावी. 'भुई-मुगाची लागवड' किंवा 'कंपोस्ट खताचे खड्डे' या विषयावर होणारे शेतकी-मंत्र्यांचे भाषण आठवा आणि मग एखाद्या सावणाची किंवा टूथपेस्टची जाहिरात त्या भाषणापेक्षा अधिक सुखद असेल की नाही, ते सांगा. सामान्य माणसाने घेतलेली सामान्य माणसाची मुलाखत आठवा आणि त्यापेक्षा डांस-नाशक औषधाची जाहिरात अधिक सुसह्य असते हे कबूल करा. नभोवाणीवर होणाऱ्या शुष्क चर्चा, रडव्या श्रुतिका आणि कामगारांना कारखान्यातली दगदग परवडली असे म्हणायला लावणारे कामगारांसाठी होणारे कार्यक्रम लक्षात घेतले, तर कुठल्याहि केशवर्धिनीची किंवा चक्का-श्रीखंडाची जाहिरातच त्याहून विलोभनीय असेल, हे सांगायला नकोच.

परिसंवाद प्रा. कोतेकर व पत्रकार गोडे



विद्यार्थ्यांच्या वंगलीला आणखी एक कारण दाढीसाठी उत्तम बनावटीची ब्लेड मिळत नाही!

मात्र कार्यक्रम वेगळा आणि जाहिराती वेगळ्या असे न वाटता सध्या नभोवाणीवर होणाऱ्या कार्यक्रमातच जाहिरातींची पखरण केली, तर ती अधिक मनोरंजक होईल. जाहिरातींची वेगळी वेळ ठेवली, तर अनेक लोक आपला रेडिओ फक्त जाहिरातींच्या वेळी लावतील आणि कार्यक्रमाच्या वेळी तो वंद करतील, अशी भीति आहे. तसे झाले, तर नभोवाणीचे कार्यक्रम चांगले झाले, अशा आशयाची पत्रे तरी कोण पाठविणार? म्हणून रेडिओवर जाहिरात घेण्यास सुरुवात झाली आहे असे समजून आपण १९७७ च्या काळात जाऊ.

सकाळी आपण उठल्यावरोबर रेडिओवर 'मंगल प्रभात' हा कार्यक्रम ऐकू येतो. खरे म्हणजे आपण उठण्यापूर्वीच हा कार्य-क्रम सुरू झालेला असतो कारण आपल्यापूर्वी कोणीतरी उठून रेडिओ सुरू केलेला असतो. आता ऐका, दहा वर्षांनंतरची 'मंगल प्रभात'

(ध्वनिमुद्रिकेत गाणे सुरू असते—)

**हांसत दिनकर आला**
**लाल गुलाबी जरिचा पांघरुनि शेला.**

(निवेदक) शेले, पातळे, चादरी, ब्लाउझ-पीसेस यासाठी एकमेव दुकान: 'आठवले, विसरले आणि कंपनी' गिरगांव.

(दुसरी ध्वनिमुद्रिका)

**झिम झिम बरसति अमृत धारा**
**कणकण झाला, सहिरा, बहिरा**

(निवेदक) वहिरेपणावर हमखास उपाय; डॉ. कोटणीस यांची लॅबोरेटरी, [illegible] चौक, पुणे.

(तिसरी ध्वनिमुद्रिका)

**एक जिवाला तळमळ लागे।**
**तुटती सारे कोमल धाग**

(निवेदक) न तुटणारा धागा घ्या. ज्युपिटर कॉटन अॅण्ड थ्रेड कंपनी, ... हाऊस. ठोक मालावर जादा कन्सेशन.

(चौथी ध्वनिमुद्रिका)

**मी तुला, न पाहिले, तू मला न पाहिले**

(निवेदक) असे कां होतं ? एकमेकांच्या जवळ असूनहि आपण कां पाहू शकत नाही? याचे कारण म्हणजे दृष्टिदोष. म्हणून डोळे तपासून घ्या. फेमस ऑप्टिशियन्स, फ्लोरा-फौंटन, मुंबई नंबर एक.

**तो आणि ती :**



**माया आणि प्रेम असल्या फालतू गोष्टीवर बोलू नकोस... संसाराची घडी ही मुटाच्या घडीवर अवलंबून असते...**

(पांचवी ध्वनिमुद्रिका)

**चांदणे झाले ग केशरी**

(निवेदक) उत्कृष्ट केशर. भूत छाप केशर. सोल एजंट, बाबूभाई अंबालाल मेहता, काळबादेवी.

(सहावी ध्वनिमुद्रिका–अभंग)

**आता तरी पुढे हाचि उपदेश। नका करू नाश आयुष्याचा**

(निवेदक) आयुष्याचा नाश करू नका. सालकर यांचे संध्याकाळचे वर्ग.एस्. एस्.सी., बी. ए.,बी. टी.साठी सालकर क्लासेस. माफक फी. उत्तम शिक्षण. आयुष्याचा नाश न करता वेळ कारणी लावा. फावल्या वेळात अभ्यास करून फक्त अठरा वर्षांत बी.ए. पदवी मिळवा. सालकर क्लासेस, एल्फिन्स्टन रोड पुलाखाली, मुंबई.

प्रचलित विषयावरचा परिसंवाद हे नभोवाणीवरच्या बौद्धिक कार्यक्रमाचे एक प्रमुख आकर्षण होऊ शकेल. आणखी दहा वर्षांनंतर हा परिसंवादाचा कार्यक्रम असा होईल, असा अंदाज आहे.

**प्राचार्य लेले:**–कसं काय मंडळी! आज आपण इथं कां जमलो आहोत,याची आपल्याला कल्पना असेलच. ('हो' 'हो' असे अस्पष्ट आवाज) विद्यार्थ्यांच्यात असंतोष का माजतो, या ज्वलंत प्रश्नाची चर्चा करण्यासाठी आपण इथं जमलो आहोत. तर मग प्राध्यापक वसंत व कोतेकर, आपण प्रथम सागा, की, आजचा विद्यार्थी असंतुष्ट कां आहे?

**प्रा. कोतेकर:**–मला वाटतं आजचा विद्यार्थी संतुष्ट नाही हे त्याच्या असंतोषाच मुख्य कारण आहे.

(क्षणभर स्तब्धता. मग एकदम बरोबर आहे, बरोबर आहे, असे आवाज)

**प्राचार्य लेले:**–बरं, पत्रकार शामराव गोडे, आपलं मत काय ?

**गोडे:**–मला वाटतं–माझं चूक असेल तर मला दुरुस्त करा. मला वाटतं की विद्यार्थी, समाधानात नाही, हे त्याच्या असमाधानाचे कारण असेल.

**प्राचार्य लेले:**–तुम्ही विद्यार्थ्यांच्या दुःखावर अचूक बोट ठेवलं आहे. पण त्यानंतरचा प्रश्न असा, की आजचा विद्यार्थी कां असमाधानी आहे?

**प्रा. कोतेकर:**–कां?

**गोडे:**–कां?

**प्रा. लेले:**–कां?

**गोडे:**–आजच्या विद्यार्थ्याला जे हवं ते त्याला मिळत नसेल.

**प्रा. लेले:**–उदाहरण?

**गोडे:**–म्हणजे त्याला सकाळी उठल्यावरोबर कॉलिनॉस टूथपेस्ट मिळत नसेल; त्यानंतर त्याला लिप्टनचा ग्रीन लेबल चहा–म्हणजे तो पाचशे ग्रामला सात रुपयेवाला–तो मिळत नसेल, किंवा चहाबरोबर त्याला शांग्रिला बिस्किट्स मिळत नाहीत.

**प्रा. लेले:**–बिस्किटावरून आठवण झाली. आजकाल पार्लेची ग्लुकोजसुद्धा फार लोकप्रिय आहेत. आणि तुलनेने इतर बिस्किटांपेक्षा स्वस्तहि आहेत.

**प्रा. कोतेकर:**–मला वाटतं, मंघाराम बिस्किटांचा आपल्याला अगदीच विसर पडला असावा.

**लेले:–गोडे:** हो.हो. मंघारामचीहि बिस्किटे चांगली असतात.

**लेले:**–बिस्किटांवरोबरच पार्ले ही कंपनी चॉकलेट्स टॉफी तयार करते. आणि गोल्ड-स्पॉट हे तिचे पेयहि फारच रुचकर असते, हेहि आपल्याला माहीत असेलच. विशेषतः विद्यार्थ्यांच्या असंतोषामुळे वातावरण फारच गरम होत असल्यामुळे गोल्डस्पॉटसारख थंड पेय म्हणजे विद्यार्थ्यांच्या दंगलीवर उताराच आहे.

**जय किसान :**



**पवार मास्तर:–कोंबड्यानी अधिक अंडी घालावी म्हणून तुम्ही काय करता?**

**पाटील:–त्येसाठी व्हय? आम्ही सेतकी मंत्र्यांच्या भासनाची रेकार्ड आनली हाय ती फोनोमंदी ठेऊन खुराड्यात ठिवतो बघा...**

**गोडे:**–विद्यार्थ्यांच्या दंगलीला आणखी एक कारण असण शक्य आहे. त म्हणज त्याना दाढीसाठी उत्तम बनावटीची पाती मिळत नाहीत. सेवन–ओ–क्लॉकसारखी परदेशी आणि महागडी पाती वापरण्यापेक्षा त्यानी झेनिथ, प्रिन्स, अशी देशी उत्तम पाती

[पृष्ठ ६४ वर पहा]

अनुक्रमणिका



# बावल्या सरणावरून पळाला!

—वसंत सबनीस

**पळणे** हा माणसाचा धर्म आहे म्हणून माणसानं वाटेल तिथून वा वाटेल तसे पळावे हे केव्हाही गैरच. माणूस रणांगणातून पळतो, घरातून पळतो, सभेतून पळून जातो इतकेच काय पण बोहल्यावरून सुद्धा पळून जातो हे खरं आहे. पण म्हणून त्यानं चितेवरून सुद्धा पळून जावं ?

आमच्या आळीतला बावल्या एके दिवशी मेला !

बावल्या हा तसा कुणाचाच नव्हता पण सगळ्या आळीचा होता. बावल्याला ओळखत नव्हता असा एकही माणूस आमच्या आळीत नव्हता. बावल्या तसा प्रत्येक घरात जात येत असे. कुणाचे दळण आणून दे, तर कुणाचे कपडे लाँड्रीत टाकून ये, कुणाचा डबा पोचव तर कुणाची भाजी आणून दे, कुणाला टॅक्सी आणून दे तर कुणासाठी टांगा आण अशी फुटकळ कामे करण्यातच त्याचा दिवस जायचा. तो तसा कुणा एकाकडे नोकरीला नव्हता. तो कुठून आला हे कुणाला कधी समजले नाही आणि तो कुणाचा कोण होता—याचीही कुणाला माहिती नव्हती. त्यानेही कधी आपली माहिती सांगितली नाही. तो आळीतच कुठेतरी दुकानाच्या पायरीवर किंवा फळीवर रहायचा, झोपायचा. लोकांची, दुकानदारांची कामे करायचा. कुणी खायला दिले तर घ्यायचा. लोकानी दिलेले कपडे वापरायचा. तशी त्याची प्रत्येकाला गरज होती पण त्याच्यावांचून कुणाचे अडतही नसे. त्यामुळे त्याचे अस्तित्व जसे प्रकर्षाने कधी जाणवले नाही तशी त्याची गैरहजेरीही ठळकपणे लक्षात येत नसे.

असा हा निर्लेप जीवन जगणारा बावल्या मेला. कसा मेला, कशानं मेला हेही कळलं नाही. जास्त खोलात जाण्याची कुणाला गरजही वाटली नाही. तो जेथे नेहमी वस्तीला असे तेथेच म्हणजे एका दुकानाच्या पायरीवर तो मेला. त्याची प्राणज्योत तेवत होती तेव्हा त्याच्याजवळ कोणीही जात नसे आणि ती मालवली तेव्हाही त्याच्याजवळ कोणी नव्हते. शिवाय मृत्युसमयी बावल्याजवळ कोण कोण होते याची नांवे प्रसिद्ध होण्याची शक्यता नसल्याने कुणालाही त्याच्याजवळ असणे निकडीचे वाटले नाही.

बावल्या मेल्याची वातमी मात्र आळीतल्या सर्व घरात पोचली. बावल्याच्या मृत्यूला उदंड सहानुभूती मिळाली पण अश्रू मात्र एकही मिळाला नाही. "बावल्या मेला ? अरेरे. . .वाईट झालं !!" कोरड्या डोळ्यानी व कोरड्या आवाजाने ठिकठिकाणी निघालेले उद्‌गार एवढीच बावल्याच्या मृत्युबद्दल आमच्या आळीत झालेली प्रतिक्रिया ! कुठेही आपुलकीचा लवलेश नाही की जिव्हाळ्याचा खेद नाही !

बावल्याला अश्रू मिळाला नसेल पण आळीनं त्याला नाकारलंही नाही. घरोघरची कामं करून बावल्यानं जोडलेली पुण्याई अश्रु मिळण्याइतकी नव्हती तरी उत्तरक्रियेला पुरेल एवढी निश्चित होती. त्यामुळं गणपत कोळसेवाला, बाबुराव लाँड्रीवाला, शिवराम












तुम्हाला वाटेल,हे कसं शक्य आहे? आम्हालासुद्धा अशक्य वाटत होतं. पण आमच्या गावातल्या गणपत कोळसेवाल्यानं बावल्याची गोष्ट सांगितल्यापासून हे सहज शक्य आहे अशी आमची खात्री झाली........

शिंपी आणि तात्या न्हावी यानी पुढाकार घेऊन बावल्यासाठी स्मशान निधी गोळा करण्याची कल्पना काढली तेव्हा घराघरातून चांगला प्रतिसाद मिळाला. मरणोत्तर निधी गोळा होण्याचं भाग्य फारच थोडयांच्या नशिबात असते पण बावल्या हा त्यांच्यापैकी एक होता! आळीतल्या प्रत्येक कुटुम्बाने बावल्याच्या अन्त्यविधी निधीला सढळ हाताने मदत केली. कदाचित् पुन्हा बावल्याच्या उपयोगी पडण्याची संधी येणार नाही असे वाटून मंडळींनी हात सैल केले असण्याची शक्यता आहे. पण एकंदरीत बरीच रक्कम गोळा झाली एवढे मात्र खरे!

बाबूराव, गणपत, शिवराम आणि तात्या यांची जणू काय 'बावल्या अन्त्यसंस्कार समिती'च स्थापन झाली. बावल्याच्या पार्थीव देहाचे भवितव्य या चौघांच्या हाती होते. संस्काराचा संबंध असल्यामुळे हे सांस्कृतिक कार्य आहे असे बाबूराव निधी गोळा करताना जे सांगत असे त्याबद्दल कुणाचेही दुमत नव्हते. इतकेच नव्हे तर बाबुरावने एकदोघाना बावल्याचा अग्निसंस्कार हा आजचा ज्वलंत प्रश्न आहे असे सांगून आपले वर्तमानपत्राच्या वाचनाचे ज्ञान सिद्ध केले होते. या सर्वांचा परिणाम असा झाला की अंत्यसंस्कारासाठी सर्वसाधारणपणे जेवढा खर्च येतो त्याच्या-पेक्षा कितीतरी अधिक रक्कम गोळा झाली. भक्कम रक्कम हाती येताच या चौघानी बावल्याचा अंत्यसंस्कार मोठ्या इतमामाने साजरा करण्याचे ठरविले. आमच्या आळीचं एक चांगलं आहे. सबंध आळीचे कार्य म्हटल्यावर सर्वजण उत्साहाने कामाला लागतात. मग तो सत्यनारायण असो, गणपती उत्सव असो नाहीतर मर्तिकोत्सव असो. उत्साह तोच, तसाच. बावल्याची अन्त्ययात्रा हाहि आळीचा सार्वजनिक कार्यक्रम होता.

बावल्यानं जीवंतपणी सोन्याचा दिवस उगवलेला पाहिला होता की नाही कुणास ठाऊक? पण मरणानंतर त्याच्या आयुष्यात असा दिवस आला होता. नाहीतर अनाथ बावल्या दुसरीकडं कुठतरी मेली असता तर त्याचे काय झाले असते हे सांगणं कठीण आहे. पण आमच्या आळीत त्याला मरण आले म्हणूनच बांबू, कडबा, कोरे कापड, मडके इत्यादि सर्व वस्तू त्याच्या नशिबी आल्या. जमलेला सर्व निधी स्मशानयात्रेसाठीच खर्च होणे आवश्यक होते. वास्तविक तात्या न्हावी व गणपत कोळसेवाला ही दोन माणसे इतकी इरसाल होती की एवढी रक्कम त्यांच्या हाती पडल्यानंतर ती रक्कम आपल्या खिशात राहण्यासाठी त्यानी वाटेल ते केले असते. काय असेल. ते असो किंवा त्याना पैशाच्या बाबतीत स्मशानवैराग्य आले असेल म्हणून असो — पण त्यानी पैशाचा अपहार करण्याचा थोडासुद्धा प्रयत्न केला नाही. त्यामुळे सर्व सामान यथासांग आणूनही बरेच पैसे उरले. तेव्हा भजनही आणावे असे ठरले. बँडची पद्धत नव्हती नाहीतर तोही मंडळींनी आणला असता. इतकेच नव्हे तर प्रत्येकी तीन तीन रुपये देऊन दोनचार भाडोत्री खांदेकरीही आणण्यात आले.

सगळी जमवाजमव होईपर्यंत रात्र झाली. भजन मंडळी आपा-पल्या वाद्यासह हजर झाली. अंत्यसंस्कार-समितीचे सर्व सभासद तयार झाले. आळीतील इतर लोक मात्र सर्व तयारी करून देऊन आपापल्या घरी परत गेले. शेवटी समितीचे सभासद, बोलावलेले खांदेकरी, भजन मंडळी आणि बावल्याचा पार्थीव देह एवढेच अन्त्य-यात्रेतील भागीदार होते.

लाकडे, रॉकेल वगैरेसाठी सढळ हाताने खर्च करूनही पुन्हा पैसे शिल्लक राहिले. गणपत आणि तात्या यानी स्मशानयात्रेची रंगत व शोभा वाढविण्याची आणखी एक योजना आखली. भजन मंडळीला जोम यावा आणि भजनाला रंग भरावा म्हणून निधीच्या रकमे-तून भारीपैकी हातभट्टीच्या बाटल्या आणविण्यात आल्या. भजन मंडळी, खांदेकरी आणि समितीचे कार्यकर्ते यानी बाटल्या रिकाम्या करून आनंदसागरात बुड्या मारल्या. एकटा बावल्या सोडून सर्वांना परम संतोष जाहला. भजन मंडळी मुळातच श्रद्धाळू. तेव्हा केवळ बावल्याच्या कृपेमुळे हा दिवस उजाडला असे वाटून त्यांच्यापैकी काहीजणानी भारावून जाऊन चक्क बावल्याच्या पायाला हात लावला. कारण कुठल्याही स्मशानयात्रेत त्यांना इतका 'आनंद' कधीच मिळाला नव्हता. त्या आनंदाच्या भरात बाव-ल्याला स्मशानापर्यंतच काय पण स्वर्गापर्यंत नेऊन पोचविण्याचीही त्यांची तयारी होती. खांदेकऱ्याना तर हे कष्टाचे काम स्वदेही 'आनंद' निर्माण झाल्याशिवाय करताच येणे शक्य नव्हते. त्यामुळे त्याना 'आनंदा'श्रय घ्यावाच लागला.

आणि मग ह्याच कार्यक्रमाला रंग भरू लागला. सर्वजण 'आनंद'मय झाले. साहजिकच सगळ्यांची पातळी एकदम वाढली. बाटलीच्या आधाराने आपण भौतिक जगातून अध्यात्मात केव्हा व कसे गेलो हे कुणालाच कळले नाही.

"मानसाच्या देहाचा भरोसा न्हाइ. . . आता हाय तर मग न्हाई" एकजण बोलला.

"अरं आयुक्ष म्हंजी अळवावरलं पाणी. . ." दुसरा म्हणाला.

"कोन रं त्यो तिरपागड्या डोक्याचा पानी मागतो, ह्या वक्ताला–अरं हतं बाटल्या पडल्यात आन् पानी पायजेल व्हय तुला?" तिसऱ्याचा आवाज.

"अरं..बाटलीतलं पाणी न्हाइ. .अळवावरलं पाणी. .कोय खरं हाय का न्हाइ . .? बोला राव"

"जीव हाय तवर सगळं हाय.. एकदा जीव गेल्यावर....तात्यां बाटल्या संपवू नगस हां इक्त्यात...अजून लइ टाइम काडायचा हाय.. तर मी म्हनतो जीव हाय तर सगळं हाय...एकदा जीव गेल्यावर.. म्हंजी कसलं पानी म्हनालास तूं?"

खळवावरलं पाणी....."

"हां.....बराबर....एकदा जीव गेल्यावर......त्या भजनवाल्याना संबाळा... प्यालेत साले........."

"पर तुमाला सांगतो बावुराव......प्रत्येकानं पुन्य साठिवलं पायजेल...... एकरंत पुन्य..... त्यवडच खरं हाय...."

"तू साठिवलस का?"

"काल घरनंच सुरवात केलीया . . ."

"म्हइ म्हणा पण हा बाबल्या पुण्यवान". कुणीतरी म्हणालं.

"कशावरनं ?" दुसऱ्याचा सवाल.

"अरे हा पुण्यवान नसता तर याच्या मतिकेसाठी इतका पैसा जमला असता का ? आणि इतका पैसा जमला नसता तर आपल्याला इतका 'आनंद' मिळाला असता का ?"

सर्वांचे याबाबतीत एकमत झाले आणि बाबल्या पुण्यवान असल्याचे सर्वांना एकमत पटले. अध्यात्माची गुंगी मात्र चढतच होती. देह नश्वर असल्यामुळे आणि उद्याचा भरवसा नसल्यामुळे आजच जमेल तेवढी सर्वांनी पिऊन घ्यावी असा निष्कर्ष काढून मंडळी पुन्हा- अध्यात्मात रमली. मधून मधून कुणीतरी कुणाला तरी 'चला रं. . . वेळ होतोय' असं म्हणत होता. पण कुणीच जागचा हालत नव्हता. दरम्यान तात्या न्हावी उठला आणि पुढे चालू लागला. पण तो बाबल्याच्या तिरडीलाच ठेचाळला. आपण कशाला ठेचाळलो हे त्याच्या लक्षात आलं नाही. तो चिडून म्हणाला, "साली रस्त्याच्या मधोमध येऊन कशाला झोपतात कुणास ठाऊक ?" असं म्हणून त्यानं वाटेत 'झोपलेल्या' बाबल्याला एक जोरदार शिवी हासडली आणि आपणच बाजूला जाऊन बसला. प्रेतयात्रेच्या वेळी नेहमी रडारड ऐकण्याची संवय झालेल्या खांदेकऱ्याना बाबल्याच्या ह्या बिनरडयाच्या प्रेतयात्रेत सारखे चुकल्या चुकल्यासारखे वाटत होते. तेव्हा ही उणीव राहू नये म्हणून त्यांच्यातल्याच एकाने बाबल्याला मिठी मारून जोराने भोकाड पसरले. मग इतरानाही रड आले. मग बराच वेळ सर्व मंडळी अश्रू न सांडता मनसोक्त रडली.

रडण्याचा आवाज ऐकू येताच थोडया अंतरावर झुलत राहिलेल्या भजन मंडळीना वाटले की तिरडी उचलली गेली. तेव्हा त्यानी टिपेच्या सुरात अभंग फेकायला सुरवात केली. मृदंग घुमू लागला. टाळ रंगात आले आणि भजन मंडळी नित्याच्या संवयीने मागे न पाहता पुढे चालू लागली. भजन मंडळी चालू लागल्याचे दिसताच तिरडीच्या भोवताली बसलेली मंडळी घाईघाईने उठली आणि ज्याअर्थी भजन मंडळी पुढे गेली त्याअर्थी तिरडीही गेली असणार असे समजून त्या दिशेने पळू लागली. भजन मंडळींच्या जवळ गेल्यानंतर तिरडी आपण रस्त्यातच विसरलो आहोत हे त्यांच्या लक्षात आले. पुन्हा समितीवाले आणि खांदेवाले मागे फिरले. भजन मंडळीला याचा पत्ताही नव्हता. ती मंडळी तशीच पुढे निघाली.

गणपत कोळसेवाला, तात्या न्हावी, शिवराम शिंपी वगैरे मंडळी परत तिरडीपाशी येऊन उभी राहिली. गणपत तिरडीपाशी वाकून म्हणाला, "बाबल्या, अरं लेका तुला टक्कुरं हाय का न्हाई ? आमी समदी म्होरं गेलो आन् तू लेका डोळा चुकवून हतच पडुन न्हायलास व्हय ? सांगायचं न्हाई वरडून मी मागं न्हायलोय म्हणुन?" इतरानीही बाबल्याच्या ह्या कृतीबद्दल तीव्र नापसंती व्यक्त केली. तात्या न्हाव्यानं तर सगळयाना चक्क इशारा दिला की बाबल्याची लक्षणं ठीक दिसत नाहीत. त्याचा जळायचा विचार दिसत नाही. सगळयानी माना डोलावल्या.

अखेरीस खांदेकऱ्यानी तिरडी उचलली. गणपत कोळसेवाल्याने मडके धरले. बाबुराव लाँड्रीवालाही आपणच मडके धरले आहे अशा समजुतीत दोरीत धोंडा बांधून निघाला. 'राम नाम सत्य आहे' अशी आरोळी ठोकून खांदेकरी निघाले. बाबल्याची अन्त्ययात्रा सुरू झाली. ती यात्रा एकदा रस्त्याच्या डावीकडे झोकांडया खात होती तर एकदा उजवीकडे कलंडत होती. कधी चक्क तिरडी आडवी जात होती. भजन मंडळी सुमारे अर्धा फर्लांगभर पुढे गेली होती. आणि भजन मंडळीवर नजर ठेवून खांदेकरी मंडळी चालली होती.

सुमारे अर्धातास यात्रा चालत होती तरी स्मशान येईना. काल परवापर्यंत इथं जवळ असलेलं स्मशान आजच अचानक दुसरीकडे कसं गेलं ? याबद्दलही खांदेकरी मंडळीत चर्चा झाली. आणि माणसाप्रमाणं स्मशानंसुद्धा चावटपणा करायला लागली आहेत

**पडेल ?**

पडलो तरी
नाक वर
मंत्री नाही
तर गव्हर्नर !



**पोपट !**

पोपट पोपट
बोलतोस गोड
पण एकदा तरी
खुर्ची सोड !

असं अनेकांचं मत पडलं. नंतर थोड्या वेळाने भजन मंडळी आणि प्रेतयात्रा या दोघांचाही रस्ता साफ चुकला असून सर्वजण नेमके स्मशानाच्या विरुद्ध दिशेने निघाले आहेत हे सत्य लक्षात आले. थोडे फार शुद्धीवर असलेले एकदोघेजण भजन मंडळीकडे धावले. 'आम्ही जातो आमच्या गावाचा' आक्रोश चालूच होता. गाणारे आणि वाजवणारे जोषात होते. तेथे गेलेले दोघेजण त्याना आरडून ओरडून रस्ता चुकल्याचे सांगत होते. पण ब्रह्मानंदात विलीन झालेली भजन मंडळी त्यांचे काहीही ऐकण्याच्या मनस्थितीत नव्हती. शेवटी त्या दोघानी गाणाऱ्याचे तोंड आणि वाजवणाऱ्याचे हात धरले. तेव्हा त्यानी तारवटलेल्या डोळ्यानी विचारले "काय झालं ?"

"अरे स्मशान तिकडं राह्यलं– तुम्ही कुणीकडं चाललात ?"

"आम्ही जातो आमुच्या गावा ऽऽऽऽऽ" असं म्हणून टिपेच्या सुरात उत्तर दिले. पुन्हा भजनाचा हलकल्लोळ उडाला. सगळ्याना थांबवून अक्षरशः हातानी त्याना दुसऱ्या रस्त्याकडे वळविले. तरीही दोन तीन लोक पहिलीच दिशा धरून पुढे चालले होते. त्यानाही धरून योग्य त्या वाटेला लावले. भजन मंडळी त्याच तन्मयतेने पुन्हा पुढे निघाली.

दरम्यान प्रेतयात्रा मधेच थांबली होती. खांदेकऱ्यानी तिरडी रस्त्यातच ठेवली होती आणि त्यांच्यात वाद सुरू झाला होता. एक खांदेकरी म्हणत होता "साला जड व्हायला लागलाय." प्रत्येकानं एका हातानं तिरडी उचलून पाहिली. चौघांचेही एकमत झाले.

"आपुन काय वी तरास दिला का त्येला ?" एकानं विचारलं.

"वाकड्यात शिरायची खोड असनार त्येला जल्मापासून" दुसऱ्याने समर्थन केले.

"त्येला सांगा रं कुनीतरी...उगा भार वाढवायचं कारन न्हाइ म्हणुन."

मग एकजण तिरडीपाशी गेला आणि बावल्याला उद्देशून म्हणाला,

"का रं ? लइ गमजा करतुयास ? तुला जड व्हायचं कारण काय ?.. जसं मेलं असल तसं न्हावावं मानसानं... गुमान हुतास तसा हो... न्हाइतर उभा जाळीन तुला.. याद राख..." असं म्हणून त्यानं एक खाडकन् बावल्याच्या थोबाडीत मारली.

"आता बगा वरं उचलून ?" असं फर्मानही त्या खांदेकऱ्यानं सोडलं. पुन्हा तिरडी उचलली. पुन्हा बावल्या हलका झाल्याचं सगळ्याना पटलं.

"झाला का न्हाइ हलका ? .. मग ? माजा हिसकाच हाय तसा..." तो खांदेकरी यशाचा वाटा आपल्याकडे घेत होता. वाद मिटला आणि प्रेतयात्रा पुन्हा वाटेला लागली.

भजन मंडळी आता नीट स्मशानाच्या वाटेनेच चालली होती. पण भजन मंडळी बावल्याची तिरडी यांच्यामध्ये इतकं अमानुष अंतर पडले होते की ही भजन मंडळी बावल्याच्या प्रेत यात्रेबरोबर आहे असं ठामपणे सांगता येत नव्हतं. भजनवाले आणि यात्रावाले दोघेही वैकुंठाच्या दाराशी पोचलेले होते. बावल्याचे नशीब जोरावर होते म्हणून त्या दिवशी दुसऱ्या कुणाची प्रेतयात्रा नव्हती. नाहीतर भजन मंडळी नक्की त्याच प्रेतयात्रेबरोबर गेली असती.

भजन मंडळी कितीतरी आधी स्मशानात जाऊन पोचली. आपण फार पुढे आलो आहोत हे त्यांच्या लक्षात येताच त्यांनी भजन बंद केले आणि नमतेच बसून राहण्यापेक्षा शिल्लक असलेल्या बाटल्या संपविल्याचे कार्य केल्यास वेळ बरा जाईल असे वाटून त्यानी बैठक मारली. आनंदाचे मुक्त हस्ते वाटप चाललेले पाहून स्मशानाच्या भिंतीच्या आडोशाला झोपलेला भिकारीही भजन मंडळात घुसला आणि त्यानेही एक बाटलीभर आनंद उपभोगला व पुन्हा आपल्या जागेवर जाऊन समाधीस्थ झाला.

बावल्याची स्मशानयात्रा झोकाड्या खात अखेरीस स्मशानात येऊन पोचली. स्मशानयात्रा तेथे पोचल्याबरोबर आपण आपले कर्तव्य पार पाडल्याच्या आनंदात भजनी मंडळी निघून गेली. अन्त्ययात्रा समितीचे सभासद व खांदेकरी बरेच थकले होते. तेव्हा श्रमपरिहार अपरिहार्य होता. बावल्याची तिरडी खाली ठेवून मंडळीनी भरपूर श्रमपरिहार केला.

चिता रचायला सुरुवात करावी अशी तात्या न्हाव्याने सूचना केली आणि ती सर्वमान्य झाली. दरम्यान खांदेकऱ्यानी बावल्याचा देह तिरडीवरून मोकळा करून ठेवला होता. चिता रचण्यापूर्वी चितेची जमीन थोडी खोदून घ्यावी अशी कल्पना निघाली. तात्या कुदळ घेऊन पुढे झाला. लटपटत्या पायानी आणि डेपाळलेल्या हातानी तो पुढे सरसावला आणि कुदळ उचलून त्यानं पहिला घाव घातला; पण घात झाला. कुदळीचा घाव जमिनीवर न बसता तात्याच्याच पायावर बसला. तात्या तियंच उताणा पडून विव्हळू लागला. सर्वांनी झटपट तात्याला बाजूला घेतले. या अपराधाचे खापर मात्र बावल्यावर फुटले. शिवराम शिंपी तिरमिरीत उठला आणि बावल्याच्या खाडकन् तोंडात लगावून म्हणाला, "आणखी किती तरास देणार आहेत तू साल्या ? फार झालं हे... साल्या आतापर्यंत तात्यानं तुझ्यावर केलेले उपकार आठव. तुझ्या मुड्द्याला हात लावला नसता कुणी - पण तात्यानं खटपट केली. तुला नवं कापड घातलं. सगळ सामान आणलं... त्याचं फळ काय दिलंस तू ? त्याच्या पायावर कुदळ घातलीस ? थूत् तुझ्या जिनगानीवर." तेवढ्यात गणपत कोळसेवालाही रागानं बावल्याजवळ आला आणि त्याच्यावर खेकसला, "असली इरसाल जात पाह्यली नव्हती मी.... असलं थेर केलंस तर असाच ठेवीन तुला हतं... जाळनार दिखील न्हाइ तुला... मग कसं वाटल ?.... का रं भाड्या, त्यो गरिबाच्या पायावर कशापायी कुदळ घातलीस ? क्काय वाकडं केलवतं त्येनं तुझं ?" बावल्याच्या देहानं हे सगळं सहन केलं. "चला रं जाउया आपण परत... मरू दे साल्याला असाच हतं." असं शिवराम निर्वाणीच्या स्वरात म्हणाला.

"असं कसं करता यील आपल्याला ?"

[पृष्ठ ५४ वर पहा]



**प्रेयसीच्या बापाची भुणभूण नाहीशी व्हावी, म्हणून मी वृद्धाश्रम काढला ! नि काय झाले ? वृद्धांची चंगळ झाली ........ पण ?**

# वृद्धाश्रम

— पद्माकर गोवईकर

**माझ्या** या कल्पनेला चालना देण्यास इष्काची चित्-शक्ति कारणीभूत झाली. (असली वाक्ये एका दमात बोलून दाखवायला किस्मतची फार ठोकरे खावी लागतात.) गुप्त्यांकडे येणारी पलिकडच्या वाटव्यांच्या वाड्यातील ती शोभा नाडकर्णी. . .ती होऽऽती ऽतीऽऽ. जिने मला 'सिनेमाला येते' म्हणून थिएटरवर बोलवून आपल्या भावाकडून माझी कवळी पाडली ती. . . ! तिची मी पाठ सोडली असती तर माझ्या हातून इतके महत्वाचे समाजकार्य पार पडलेच नसते.

मार खाल्ला तरी पुन्हा सगळी हाडे जुळवून आणि तरुण वयात नवी कवळी घालून मी तिच्या मागे राहिलो. महिना महिना तिच्याभोवती सायकलवरून घोटाळलो. मी तिला पक्का निर्लज्ज आहे असे वाटेपर्यंत हिंडलो. पण बोलायची संधी मिळाली नाही. कशी मिळणार ? श्रीयुत नाडकर्णी रिटायर्ड पब्लिक हेल्थ ऑफिसर होते. रिटायर्ड असल्यामुळे त्याना भरपूर वेळ होता. या फुरसतीचा उपयोग ते शोभावर करडी नजर ठेवण्यात करू लागले. कॉलेजला जाताना, फिरायला, सिनेमाला, लायब्ररीत, सकाळी दुधाची बाटली आणताना सदोदित म्हातारा बरोबर. (म्हणजे मी किती ठिकाणे पालथी घातलीत बघा.) एवढ्या मोठ्या मुलीबरोबर हिंडताना लाज वाटायला हवी होती थेरड्याला ! तिची आई मेली म्हणून काय झाले ! इतरांना काही तिची काळजी घेण्याचा चान्स द्यायला नको का ?



एके दिवशी तिच्या मागे असताना मला एक आयडिया सुचली. या बाबतीत मी देवाचा लाडका आहे. संकटात असलो की, मला एकदम नव्या आयडियाच सुचतात. तरुण मुलींची इतक्या सावधपणे राखण करणाऱ्या म्हाताऱ्याला कुठेतरी डांबून ठेवायला पांजरपोळासारखी एखादी संस्था कां नाही, असे मला वाटू लागले. नोकरीतून रिटायर्ड झालेल्या या जर्जर म्हाताऱ्यांना जर अशा एखाद्या ठिकाणी गुंतवून ठेवले तर, आज समाजात रोमिओ, मजनू, शिरीं किंवा फरहाद हे निर्माण व्हायला किती तरी वाव आहे !

मग मीच हे काम करायचे ठरविले. ईशकृपेने मला ही कल्पना सुचली आणि एका अभिनव संस्थेचा मी संचालक झालो.

मागे एक मासिक काढण्याच्या वेळी माझे जप्त केलेले माझे पंचवीस हजार रुपये मी वडिलांजवळ परत सांगितले. त्यांना कल्पना समजावून सांगितली. वर्षातून सहा महिने त्यांनाहि तिथं येऊन राहायची विनंति केली. एक खूप खोल्या असलेला चाळवजा जुना बंगला विकत घेतला आणि त्यावर 'वृद्धाश्रम' या नावाखाली कंसात 'लॉजिंग-बोर्डिंग फॉर पेन्शनर्स' (लेडिज अँड जेन्टस् अलाऊड) अशी पाटी लावली. अॅडव्हर्टाईझ करण्याच्या हेतूने हँडबीले छापली आणि घरोघर वाटली.

शोभाच्या घरी तासा-तासाने बुलेटिन जावे तशी जाहिरातो टाकायला एक पोऱ्याच नेमला. (या सगळ्या धांदलीत मला माझी पाठ खाजवायला सुद्धा फुरसत नसे; म्हणून त्या पोऱ्याला तेहि काम करायच्या बोलीवर पगार ठरवला होता) जाहिरात अशी छापली:

**रिटायर्ड झालात—पुढे काय !**

दिवस जात नाही !
तरुण पिढीचे वागणे आवडत नाही !
अशावेळी आमची सेवा घ्या—

**वृद्धाश्रमात या !**

मनाजोगे उद्योग, करमणूक
कुणाची कटकट नाही !

लिहा किंवा भेटा:—
पोपट गायतोंडे
व्यवस्थापक
'वृद्धाश्रम'

माझ्या संस्थेतील व्यवस्था मी पहिल्यापासून अगदी झकास ठेवली होती. आपल्या देशातील रिवाजाप्रमाणे, या योजनेतील ज्याला काही अक्कल नाही, अशा शेतकी मंत्र्यालाच बोलवून मी आश्रमाचे उद्घाटन केले. त्या गाढवानेहि भाषणात सांगितले की, हे म्हातारे पीक जोपासायला अशीच नवीन तरुण मंडळी पुढे यायला पायजेलायत ! तो तरी गाढव कसा म्हणायचा ? त्याने तिथेहि आपला विषय सोडला नव्हता. ही खरे तर त्याची पिकावरील निष्ठा !

आश्रमात सगळ्या सोयी होत्या. अठ्ठावन्न वर्षावरील—(हे वय पुरे व्हायला एक महिना कमी असला तरी मी बंदी घातली होती. कारण यात काही म्हातारी जोडपी होती तसे काही विधूरहि होते.) वयाच्या म्हाताऱ्याना तिथे येण्याची तरतूद होती. हे वय विनचोक आहे असे मला वाटले होते, पण मंडळी फारच धन्य निघाली. वयपरत्वे झोप लवकर संपते म्हणून आश्रमाचा कार्यक्रम भल्या पहाटेपासून सुरू ठेवण्यात आला. नियम घालून सुरू करण्याची आवश्यकता नाही असे पुष्कळच कार्यक्रम या वयात होतात ही एक ईश्वरलीलाच असते. पहाटे तीन-साडेतीनला सर्व मेंबरे उठून भूपाळ्या म्हणत. भूपाळी कोणती म्हणायची यावरून पहिल्याच दिवशी एका विधूर म्हाताऱ्याला फ्रॅक्चर झाले. मग मी एक भूपाळी फलकावर लिहून ठेवली व तीच म्हणायचा नियम केला. भूपाळ्यानंतर त्याना कपडे चढवण्यात येऊन, त्यांच्यावरोवर मनुष्य देऊन त्याना फिरायला सोडण्यात येई. काही थेरडे फिरायला न जाता सार्वजनिक हॉलमधे येऊन, भिंतीचा आधार घेऊन शीर्षासन करीत. पण अशावेळी त्यानी हाफ् पॅंट घालू नये अशी एक सूचना पलिकडे कोपऱ्यात भजने करणाऱ्या जथ्यातील एका म्हातारीने केली. यावर दोन दिवस चर्चा होऊन शेवटी शीर्षासनानंतर भजनाची वेळ ठरवण्यात आली. धोतर घालून शीर्षासन करणाऱ्यापैकी एकाने, 'हाफ्पॅंटची एवढी मिजास कशाला ? तुम्ही तिकडे बघू नका, पण भजने त्याचवेळी घ्या.....' असा एक पर्याय आणला होता. पण तो फेटाळून लावला.

या व्यायामानंतर चहापाणी-आंघोळी होत. त्यानंतर वर्तमानपत्र वाचन. यासाठी हे लोक एकमेकांच्या उरावर बसतील म्हणून मी 'केसरी' ची मागणी एक प्रत ठेवली. यामुळे महिन्याचा रद्दीचा इन्कमहि छान जमत असे.

याखेरीज इतरहि काही तरतूद मी केली होती. वेगवेगळी औषधे (यात मूळव्याधीवरच्या औषधाला फार डिमांड होती), जुनी पंचांगे, पत्ते आणि बुद्धिबळाचे पट. (बुद्धिबळाचा पट पुढे मी बंद केला. कारण इतिहासाचे वेड असलेल्या एका थेरड्याने, अफजलखाने प्यादी म्हणून जिवंत माणसे पटावर उभी केली, तशी हॉलमध्ये खडूने मोठा पट आखून 'काही म्हाताऱ्या म्हाताऱ्याना' जिवंत उभे करून डाव मांडला होता.)

शोभाचा बाप माझ्या आश्रमात ओढून आणण्यात मला खूपच कष्ट पडले. एका विधूर म्हाताऱ्याला बिलात थोडे कन्सेशन देण्याचे कबूल करून, त्याच्या करवी त्यांचे मन वळवले. शोभाला हॉस्टेलमध्ये ठेऊन आपण आश्रमात राहिल्यास पैशाची नक्की बचत होते याची खात्री पटल्यावर मगच गृहस्थ 'वृद्धाश्रमात' दाखल झाला. या दोन्ही विधुराना खूप ठेवण्यासाठी मी रक्त आटवले.

फक्त रविवारी बोर्डिंगातील मंडळीना त्यांच्या नातेवाईकाना भेटायला येण्याचा दिवस ठेवला. पण शोभाला आपल्या वडिलाना भेटायला मध्यरात्री सुद्धा सवलत ठेवली. पुष्कळ वेळा मीच तिला फोनवर, 'काल तात्या, शोभाला भेटावसं वाटतं असं म्हणत होते. संध्याकाळी या. येता ना?' असे खोटेच सांगून संध्या-

**रडेल..........!**

अड्डू किंवा पड्डू
तिकिटांसाठी
पुढल्या वेळी
पुन्हा आम्ही रड्डू !



**कावळा..... .....!**

कावळ्या कावळ्या
कांव-कांव
निवडून आला की
वाट लाव!

काळी तिच्या बापाला सक्तीने फिरायला पाठवून मी तिला माझ्या ऑफिसात तास-तास बसवून घेऊ लागलो. त्या काळाचा अर्थातच मी फार सुंदर उपयोग करून घेत असे. आणि नाडकर्णी फिरून आले की मी मुद्दामच त्याना, 'अहो केव्हाच्या वाट पाहातायत या' असे म्हणून एकमेकाना बोलायला मिळावे म्हणून ऑफिसबाहेर शीळ घालीत पडत असे.

इथल्या म्हाताऱ्यांच्या तक्रारीनी तर माझे डोके उठले होते. रोज रात्री मुकुट काढून झोपावे तसे आख्खे डोके काढून ठेऊन, नुसत्या धडावर मी झोपत असे. एका रिटायर्ड मामलेदाराला रोज सलाम घ्यायची सवय असल्याने तो इथं अस्वस्थ झाला होता. त्याच्यासाठी तासातासाने सलाम करण्यासाठी मी एक परिवर्तित ख्रिस्ति (मुळात महार) माणूस स्टुलावर आणून बसवला. दुसऱ्या एका सब्जज्जाने आपल्याला ओव्हरकोट चढवायला माणूस नाही म्हणून कुरकुर केली. तिसऱ्या एका पी. डब्ल्यू. डी.तल्या ओव्हरसीयरने, दुपारी झोपताना दारे बंद केली तरी, वरच्या एका काचेच्या कौलामुळे प्रकाश आत येतो म्हणून दोन दिवस जेवण घेतले नाही. शिवाय तो (सपत्निक) झोपला असताना त्या पारदर्शक कौलातून कुणी तरी (छपरावर चढून) डोळे लावून खाली पाहत असल्याचा भास त्याला झाला होता. ते कौल काढून मी तिथे रेग्युलर कौल बसवले. कुठलासा एक रिटायर्ड म्हातारा खादी-भांडारचा मेंबर होता. त्याच्या टकळीने, सुताच्या बंडलाने आणि सूत काढताना 'गरगर, फिरव या चरखा' या त्याच्या गाण्याने सगळा आश्रम हैराण झाला. शेवटी 'खाजगी व्यवसाय इथे करायचा नाही' असा निर्णय करून मी त्याचा तो उद्योग बंद केला. एकदा एकमेकांच्या बायकांच्या खाजगी चिथावणीने सब्जज्जाची आणि त्यांची भर स्वयंपाकघरात मारामारी जुंपली. नुकतीच मंडई करून आणलेले कांदे-बटाटे सगळ्या आश्रमभर झाले. अखेरीस चिडून जाऊन त्या खादीधाऱ्याने आपली टकळी जज्जाच्या डोक्यात घातली. जज्जाचे डोके 'गरागर' फिरून त्यातून तांबड्या सुताची धार लागली. तो पंधरा दिवस अंथरुणावर होता.

विधुरांच्या खोल्या वेगळ्या होत्या त्यामुळे तिथे दंगल नव्हती. पण एकदा रात्री विधुर-विभागातहि भयंकर आरडा-ओरडा झाला. जाऊन बघतो तर पी. डब्ल्यू. डी.तल्या ओव्हरसीयरने एका विधूर रिटायर्ड फौजदाराचा गळा धरला होता. ओव्हरसीयरची तिसऱ्या लग्नाची बायको आश्रमातल्या सगळ्या बायकांपेक्षा थोडी अधिक तरुण व सुंदर होती. आणि हे सगळे विधुर-नर सुरवातीला ठीक होते. पुढे फार दिवसांच्या कोंडमाऱ्यामुळे वारा प्यायल्यासारखे झाले. एकदा या रिटायर्ड फौजदाराने ओव्हरसीयरची बायको आंघोळीला गेली असताना आसपास कुणी नाही असे पाहून न्हाणीघराच्या फटीला डोळा लावला होता. . . . रात्री आपण त्याची फिगर ओळखल्याचे बायकोने ओव्हरसीयरला सांगितले. तस्सा उघडा जाऊन त्याने फौजदाराचा गळा धरला. दुसरे दिवशी पुन्हा आपले लग्न जमवण्यास फौजदार आश्रम सोडून गेला.

या गडवडीत मला माझे प्रकरण चालू ठेवायला वेळ मिळत नव्हता. शोभा येऊन गेल्याची मला नाडकर्ण्यांकडून कधी तरी नुसते कळत होते. दरम्यान मी त्याना फार खुष ठेवले होते. त्याना अधुनमधून गुप्तपणे सारखा चहा द्यायला स्वयंपाकीणबाईंना सांगितले. मी माझ्या ऑफिसमधील इंग्लिश टाइम्सहि त्याना खाजगीरीत्या वाचायला देत असे. एक दिवस चांगली तीथ पाहून मी शोभाबद्दल विषय काढण्याच्या स्वप्नात होतो.

तेवढ्यात त्यानेच मला एक जबरदस्त हादरा दिला. ज्या स्वयंपाकीणबाईला मी गुप्तपणे त्याला चहा द्यायला सांगितला होता ती गोदूबाई खरे तर अगदी बिनधोक होती. लठ्ठ, गिड्डी, काळी आणि पुढचे सहा दात राक्षिणीसारखे ओठावर. तिने मी सांगितले त्यापेक्षाहि कमी काळाच्या अंतराने नाडकर्ण्यांना चहाला स्वयंपाकघरात सारखे बोलवून संघटण वाढवले. त्यानीहि आपल्या पूर्वायुष्यातील ऑफिसच्या कामातील गोंडा घोळण्याच्या वृत्तीवर गोदूबाईवर केव्हा भुरळ घातली हे तिला आणि क्रमाने नंतर मलाहि कळले नाही.

एक दिवस रात्री मी रजिस्टर चाळीत बसलो असताना नाडकर्णी अंगाला अत्तर बित्तर लावून माझ्या ऑफिसमधे आले. त्यानी डाव्या मनगटात संध्याकाळी फिरून येताना विकत आणलेला एक पांढरा गजराहि अडकवला होता. मी चकितच झालो. रजिस्टर बाजूला ठेवीत मी त्याना विचारले,

"या साहेब, कसा काय आमचा आश्रम वाटतो?"

"वा? फार सुंदर आहे हो!" नाडकर्णी गजऱ्याचा वास घेत म्हणाले, "विशेषत: स्वयंपाकघरातील जेवण-खाण्याच्या सोयी फार अप्रतिम आहेत."

मग इकडचे तिकडचे थोडा वेळ बोलून त्यानी हलकेच गोदूबाईबद्दल विषय काढला. अगदी हलक्या आवाजात मला आपल्या रोमँटिकपणाचा हकिकतनामा ऐकवला. एकदा रात्री गुपचुपपणे दुसऱ्या दिवशीची तोंडली चिरून देऊन तिला स्वयंपाकाच्या कामात कशी मदत केली, हेहि त्यानी सांगितले. आणि शेवटी,

"आम्ही आयुष्याच्या उतारावर आधारासाठी उभयता प्रीतिविवाह करीत आहोत...." असे मला सांगितले. मला झोकांड्या जाताहेत असे वाटेपर्यंत इतका वेळ दाराआड उभ्या असलेल्या खुद्द गोदूबाईनीच निर्लज्जपणे लाजत लाजत एन्ट्री घेतली. (या भयानक प्रकाराने मी जो ताठ झालो तो पुढे आठ दिवस वाकू शकलो नाही.)

त्या जोडप्याचे अभिनंदन करून मी भोवळ येऊन झोपायला गेलो.

याचा परिणाम व्हायचा तोच झाला. नाडकर्णी पुनर्विवाह करून घरी गेले आणि घरात सावत्रेपण आणायला माझा आश्रम कारणीभूत झाला म्हणून, माझे तोंड आयुष्यभर न दाखविण्याची मला सांगून शोभा जी निघून गेली, ती तडक एका भुक्कड, लड्डू मारवाड्याशी लग्न लावून मारवाडात निघून गेली....!

पुढे केवळ शोभासाठी वृद्धाश्रम काढला असे लोकाना वाटू नये म्हणून मी तो जिद्दीने चालवणारहि होतो, पण गोदूबाईवर आश्रमातील ज्या एका आचाऱ्याचे प्रेम होते त्याने माझ्यामुळे गोदूबाई त्याच्या हातची गेली असा प्रचार करून सर्व आचाऱ्याना संप करण्यास भाग पाडले. व केवळ त्यामुळे मी आश्रम बंद केला. व आता इथे घडलेल्या घटनांच्या पार्श्वभूमीवर वृद्धाश्रमाची ही इमारत साहित्य परिषदेला देण्यास योग्य झाली आहे, म्हणून मी देणगी देणार आहे !

अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

-छक्षार मणयाचा हास्यकल्लोळ ( एकांकिका ) !

# आम्हीहि सुंदर झालो असतो !

—ह. शि. खरात

**[पात्रे– रघु राजवाडे, तानाजी घोरपडे, सूर्यकांत पिसाळ, कु. खजिना खंचनाळे ]**

स्थळ – रघू राजवाडे याची खोली कम्–अभ्यासिका. खोलीला पुराणवस्तु-संग्रहालयाची कळा. एका कोपऱ्यात छत्रपति शिवरायांचा पुतळा. भितीवर रामदास, मारुति यांच्या तसविरी. रघू खुर्चीत जुने कागदपत्र न्याहाळीत आहे. आतून दार लावलेले. अधून मधून शेजारील रेडिओची घरघर. म्हणून वैतागलेला. "काय ही रेडिओची कटकट" म्हणून खिडकी खाडकन् बंद करतो. काही वेळाने दारावर थाप पडते—

बाहेरचा आवाज – रघू ! अरे रघुनाथ ! (रघूचं लक्ष नाही.) अहो इतिहासाचार्य ! (लक्ष नाही). रघ्या, साल्या दार उघडतोस कीं दरवाजा तोडू आता– जिवंत आहेस ना रे आत, का मेलास–

**रघू** – (भानावर येऊन) कोण ? कोण आहे ? काय हे लोक मधेच तडफडतात. एखाद्या तटबंदीला खिंडार पडावं तसं हे पुढ्यात येऊन पडतात. (जाग्यावरून उठत) कोण आहे ? थांबा जरा. घोड्यावर बसल्यासारखं करू नका जरा लगाम खेचा त्याचा. शत्रूसन्यं पाठीशी लागलंय् तुमच्या की तुम्हीच आमचे दुश्मन बनून आलात. (दार उघडतो) कोण तानाजी ?

**तानाजी–** (प्रवेश करून) रघ्या, ओरडून ओरडून घसा बसला माझा. आणि हे काय? खिडक्या-दारे बंद करून आत झोपला होतास काय? (खिडकी उघडतो) रघ्या, जागा रहा, जागा रहा. आता तुझे दिवस चांदण्याचे आणि न सरणाऱ्या रात्री. तुझं लक्ष आहे का मी काय बोलतोय् याकडे ?

**रघू**– (भानावर येऊन). यावं, यावं तानाजीराव. खाशानी आज



अवेळी येणं केलत. तसा निरोप धाडता तेर स्वागतासाठी आम्ही स्वत:च्या पायानी स्वारीच्या पायी हजर झालो असतो.

ता– रघ्या, मराठीत बोल मराठीत.

रघू– मराठीत बोल म्हणजे ?

ता– म्हणजे चार चौघांसारखं साधं सरळ बोल. आधी ही नाटकी भाषा सोडून दे.

रघू– माझ्या मऱ्हाट-मोळया भाषेला रानटी भाषा म्हणतोस.

ता– जास्त बोलायला लावू नकोस. आधीच ओरडून घसा बसलाय माझा.

रघू– आमच्या दिंडी दरवाज्यावरील वेल जर तुम्ही दाबली असतीत तर तुमच्या उदंड नरड्याला एवढी तकलीफ झाली नसती.

ता– हा तुझा दिंडी दरवाजा माझ्या खांद्याला लागतोय् अन् ती तुझी वेल दाबून दाबून अंगठा तुटायची वेळ आली. वाटलं वेलपेक्षा जावून तुझा गळा दाबावा.

रघू– स्वारी आज घुश्श्यात ! काही बिघडलं वाटतं ?

ता– रघ्या, ती वेल आणि तुझा मेंदू दोन्हीहि बिघडलेत ते आधी दुरुस्त कर.

रघू– आम्ही तर ते साफ भुलून गेलो होतो. स्वारीची इच्छा लवकरच पूर्ण होईल.

ता– रघू आता पाया पडू का तुझ्या ? ही नाटकी भाषा तू केव्हा सोडणार ?

रघू– ही आमच्या मराठी इतिहासाची भाषा आहे. आणि इतिहास हा माझा जीव की प्राण.

ता– तेच ते. तू आधी हा इतिहासाचा नाद सोड.

रघू– इतिहासाचा नाद तुला भलता सलता वाटतो का ? साऱ्या जगानं मान्य केलंय् की देशाला भूगोल नसला तरी चालेल पण इतिहास हा पाहिजेच. कारण ज्याच्या नशिबी इतिहास नाही त्याच्या भाळी उपहास हा लिहिला आहे, समजलास.

तानाजी– पण तुझ्या भाळी काय लिहिलंय् हे आधी तू कां वाचीत नाहीस ?

रघू– मतलब ध्यानात नाही आला आमच्या.

ता– इतिहासाचा नाद सोडल्याशिवाय तो येणार नाही.

रघू– (मूडमध्ये) जगदंब ! जगदंब ! काय ऐकतोय् हे आम्ही ? आमच्या कानात कोणी गरम शिसं तर ओतीत नाही ना ? इतिहास आणि विस्मरण अशक्य ! बिलकूल अशक्य !

ता– अरे पण हल्ली इतिहासाला विचारतो कोण ?

रघू– विचारतो कोण ? जिवंत माणूस इतिहासाला कधीच विसरणार नाही.

ता– तू आणि जिवंत ! (हसतो)

रघू– मग हा चालता बोलता देह म्हणजे आमचं भूत आहे वाटतं ?

ता– त्याशिवाय का तू नेहमी भूतकाळात वावरतोस. लेका, आम्ही तुझ्या खबरीला यावं तर तू कोणत्या तरी किल्ल्यावर किंवा कुणाच्या तरी मसलतीत. वर्तमान कशाशी खातात हे तुला माहित तरी आहे का ?

रघू– वर्तमान ! बोल काय सांगू वर्तमानाचं ?

ता– अगदी साधी गोष्ट सांग. आज मेट्रोला कोणतं पिक्चर लागलंय् ?

रघू– तू आमची चेष्टा करावीस हीच गोष्ट आमच्या दिलाला बेचैन करते. जीव कसा म्यानेतल्या तलवारीसारखा मनातल्या मनात आग आग होतो. पण तू दिलाचा सच्च्या दोस्त म्हणून आम्ही दिल मोठं करतो.

ता– याचा स्पष्ट अर्थ असा आहे कीं तुला इतिहासाची गोळी जास्त झालीय्. थोडक्यात तुला इतिहास चढलाय्.

रघू –तू काहीहि म्हण तानाजी, आता इतिहास हाच माझा ध्यास नि संशोधन हेच माझं धन.

ता– रघू, माणसाला नाद असावा. नव्हे असतोच. पण त्याला काही मर्यादा. तर आपला सदान्कदा बखरीत पुरलेला.

रघ– मी बखरीत असेन नाहीतर कबरीत, पण लक्षात ठेव कबरीतच खरा इतिहास दडलेला असतो. फक्त संशोधन करायला हवं.

ता– रघू तू खरंच ग्रेट आहेस.

रघू– त्यासाठी तपस्या पाहिजे तपस्या. कविलोकाना धोंड्यातून काय दिसतं कुणास ठाऊक. पण आम्हाला दगडा-धोंड्यातून सारा इतिहास दिसतो.

ता–मला सुद्धा कधी कधी तुझ्यात धोंडा दिसतो.

रघू– बस् ! बस् ! आता चेष्टा पुरे ! मराठी माणसाला इतिहास म्हणजे पंचप्राण ! आम्ही आमचं राज्य देवू पण आमचा इतिहास देणार नाही.

ता–पण हल्ली इतिहासामुळं कुणाचं अडतंय् का ?

रघू–आमचं चुकतं ते इथच. जे विसरायला नको तेच आम्ही विसरतोय्. आम्ही त्या छत्रपति–

ता– थांबा, थांबा, रघुजीराव त्या महापुरुषाचं नका नांव घेवू.

रघू– नांव नको घेवू. सध्या तेच नांव घेण्याची वेळ आलीय्.

ता– उलट जगाच्या बाजारात या नांवाचं अगदी गुळगुळीत नाणं होण्याची वेळ आलीय्.

रघू– त्या महापुरुषाच्या नावाचं चलनी नाणं व्हावं हे आमचं दुर्दैव! रोज सकाळी देवाच्या नांवाबरोबर ते नांव घ्यावं एवढी त्या नांवाची पुण्याई !

ता– म्हणूनच बाजारवाले शिवाजीच्या नांवावर जशा विड्या खपवतात तशीच मतंहि दबवतात.

रघू– म्हणजे आम्ही जे विसरायला नको तेच विसरतोय्.

ता–खरं आहे तुझं. हल्ली पानाच्या गादीमुळे आम्ही मानाची गादी विसरलोय्.

रघू–आणि त्या गादीचे आपण वारस आहोत हेहि आपण विसरलोत.

ता– (मोठ्याने हसून) कोण तू वारस ? लेका रघ्या, तुला झोपायला तरी गादी आहे का ?

रघू–तानाजी, चेष्टा करू नकोस. आज देशाला कधीच नव्हती एवढी शिवाजी राजाची गरज आहे.

ता– पण चोवीस तास जुनाट कागदपत्रं चाळत बसणं म्हणजे–

रघू– अरे ह्या ऐतिहासिक कागदांचो दुनियाच निराळी. एकदा का त्या जगात प्रवेश केला की या खोलीचा रायगडच्या पायथ्याशी जणू शामियाना होतो– शेजारी चाललेल्या भांडचांच्या आदळआपटीचा शस्त्रांच्या खणखणाटात बदल होतो. रेडिओची किंकाळी तुतारीची रणभेदी वाटते. सारा रायगड जागा होऊन जणू बोलू लागतो. असं वाटतं, असं वाटतं– तानाजी, माझं फार मोठं स्वप्न आहे रे–

तानाजी– स्वप्न ? कसलं स्वप्न ? गुलाबी–निळं–जांभळं-पिवळं-हिरवं-नारंगी-तांबडं-पारवं–पांढरं कीं काळं ?

रघू– एक सुंदर स्वप्न–एक विशाल स्वप्न ! दिवसाच्या प्रकाशाहून स्वच्छ आणि रात्रीच्या शक्तीहून मोठं. तानाजी, असं वाटतं–असं वाटतं.

ता– थांब रघू. तुझ्यासारखंच कधी कधी मलाहि वाटतं. हो अगदी लहानपणापासून वाटतंय् ?

रघू– खरंच तुला सुद्धा वाटतं–

ता– होय रघू. मला सुद्धा वाटतं. माझं सुद्धा एक मस्त स्वप्न आहे. मनाच्या खोल खोल कप्प्यात ते एखाद्या गिरेबाज कबुतरासारखं घुमतंय् बघ. रघू असं वाटतं–

रघू– काय वाटतं तानाजी ? सांग, लवकर सांग.

ता – रघू, असं वाटतं कीं आपण एक मस्त तमाशा काढावा.

रघू – (चिडून) तान्या, बस् कर तुझा तमाशा. आम्हाला हे सहन होत नाही.

ता– तमाशा ! अहाऽहा ! (ढोलकी वाजविण्याचा अभिनय करीत) डिग्-डिग्-डिग्-डिग ! रघू, फार फार दिवसांचं स्वप्न आहे हे. अहाहा ! तमाशा ! डिग्-डिग्-डिग्-डिग ! एक मस्त तमाशा असावा. त्या तमशात एक चवळीची शेंग असावी– हिरवी गरगरीत. कोवळी लुसलुशीत–तिनं इर्कल नेसावी–हिरवी झुळझुळीत– अन् चोळी घालावी तेन्याची– कोरी करकरीत– तिच्या पायात–तिच्या पायात घुंगरु असावेत छुमछुमणाऱ्या झऱ्याचे अन् नाकात नथ. अशी असावी कीं जणू मदनाची धनुकली. अन् तिची नजर अशी असावी जणू मदनाचा तीर. त्या चवळीच्या शेंगेनं पदराचा फणा काढून असं ठुमकत ठुमकत यावं कीं पहिल्याच सलामीला पब्लीकला अ‍ॅटमबॉम वाटला पाहिजे. अ‍ॅटम बॉम ! अहाऽहा ! ती चवळीची शेंग अ‍ॅटमबॉम आणि मी बाजीराव !



रघू– कोण बाजीराव ? बाजीरावाचं नांव घेताच घोड्यावर बसून हुरड्याची कणसं खाणाऱ्या त्या तलवार बहाद्दराची छबी डोळ्यापुढं येते.

ता– छे छे ! रघू, तो बाजीराव नाही.

रघू– पहिला बाजीराव नाही ?

ता– डिग्–डिग्–डिग्– नाऽ ही !

रघू– मग तो दुसरा बाजीराव ?

ता– डिग्– डिग्– डिग्– डिग – नाऽही !

रघू– मग हा बाजीराव कोणता ?

ता– पहिला नाही– दुसरा नाही–तिसराहि नाही. आम्ही फक्त डिग्-डिग्– डिग्– डिग बाजीराव ! (शिटी वाजवून) ऐका ! या चवळीचं म्हणणं काय हाय? डिग्–डिग्–बाजीरावाचा वग ठासून घोळून झालाच पाहिजे.

रघू– तान्या– तू अक्कलशून्य बाजीराव आहेस. बंद कर तुझा तमाशा. तो बघ रायगड माझ्याशी बोलायला किती अधीर झालाय्.

ता– सत्यानाश ! रघ्या– त्या रायगडाशीच बोलणार असशील तर मी जातोच कसा—

रघू– मग आला होतात कशाला ?

ता– असं मुद्यावर ये. रघू – आता तुझे दिवस चांदण्याचे आणि न सरणाऱ्या रात्री.

रघू– रात्रंदिन आम्हा युद्धाचा प्रसंग– प्रत्येक रात्र वैऱ्याची अन् तू म्हणतोस—

ता– हे बघ मी तुझ्यासाठी खास कामगिरी घेऊन आलोय्.

रघू– खांशी स्वारी आमच्यासाठी खास. काही दगाफटका– लखोटा-विकोटा–

ता– लखोटा नाही पण चिठ्ठी आणलीय् चिठ्ठी !

रघू– चिठ्ठी ! कुणाची चिठ्ठी ?

ता– कुणाची म्हणून काय विचारतोस. खंचनाळेची.

रघू– खंचनाळेची !

ता– घाबरू नकोस. तो पहिलवान खंचनाळे नव्हे. ती आहे आपल्या वर्गातील कु. खजिना खंचनाळे.

रघू– म्हणजे माझ्या लक्षात नाही आलं.

ता– लेका, आधी चिठ्ठी वाच नि मग बोलू.

रघू–(वाचतो) प्रिय रघू– रघू म्हणू की रघुनाथ म्हणू... (थांबतो).

ता– रघ्या, बेटया आगे बढो.

रघू– (वाचतो) रघू– आज किती किती दिवस मी तुला सांगेन–

सांगेन म्हणतेय– पण– पण कसं सांगू–काय सांगू– कधी सांगू– कुठे सांगू– त्यासाठीच रघू मी आज तुझ्याकडे येतेय्– फार महत्वाच्या कामासाठी तुझीच– ख-जि-ना-खंच-नाळे. (चिठ्ठी हातातून गळते) बापरे !

ता– त्यात एवढं घाबरायला काय झालं ?

रघू– पण ही खजिना खंचनाळे कोण ?

ता– जे विसरायला नको तेच विसरलास. रघ्या, खजिनाला कोण विसरेल–कॉलेज क्वीन ! अरे अशी पदर सावरायची–अशी पदर सावरायची कीं जणू सतार वाजवतेय्.

रघू– पण तिचं माझ्याकडं एवढं कसलं काम आहे ?

ता– इतिहास नडतोय् बरं इतिहास – ती तुझ्यामागे आणि तू इतिहासाच्या.

रघू– तें कालत्रयी शक्य नाही. तानाजी, जा तिला सांग माझं लग्न झालंय् म्हणून–

ता– रघ्या, काय बोलतोस हे ? अरे खजिना पाहिल्यावर विवाहित माणूस सुद्धा मी अविवाहित आहे अशी चक्क थाप मारेल. रघू, सारा इतिहास अशाच थापानी घडला आहे.

रघू– सुटलेला बाण आणि फुटलेला शब्द सारखाच. तानाजी, माझं लग्न झालंय्.

ता– पण कुणाशी ?

रघू– इतिहासाशी !

ता– (आश्चर्याने) कुणाशी ?

रघू– (खंबीर) इतिहासाशी. देशाला आज इतिहासाची गरज आहे. आम्ही इतिहासावर प्रेम केलं पाहिजे.

ता– इतिहासावर प्रेम करायला काही हरकत नाही रे. पण त्याच्याशी लग्न करायला तुला कुणी सांगितलं ? त्या बिचाऱ्या खजिनाच्या प्रेमाचं काय–तिला तुझ्याशी लग्न करायचंय.

रघू– हे तुला कुणी सांगितलं ?

ता– खुद्द खजिनानंच.

रघू– (वैतागून) पण मला तिच्यात इतिहासाचं दर्शन होत नाही.

ता– तिच्यात इतिहास नाहीच मुळी. नुसता भूगोल आहे, भूगोल–

रघू– भूगोल ?

ता– नुसता भूगोल ! पर्वत-दऱ्या-टेकड्या.

रघू– भूगोल हा माझा विषय नाही. भूगोलासारखा दुसरा विनोदी विषय नसेल.

ता– लेका, भूगोलासारखा दुसरा रोमॅन्टिक विषय नाही. ज्याला आयुष्यात काही करता येत नाही त्याने खुशाल इतिहासाला कवटाळावं. परन्तु ज्याला काही करून दाखवायचंय् त्याला सारा भूगोल मोकळा.

रघू– ते काहीहि असो. तिला माझा निरोप दे की–

ता– निरोप कसला देतोस. तीच इकडे येतेय् कल्याणहून–

रघू– कल्याणहून ! अहाऽहा ! कल्याण म्हटलं म्हणजे डोळ्यांपुढं झरकन् इतिहासाचं एक सुवर्णपान तळपून जातं.

ता– तेतुझ्या. पण माझ्या डोळ्यापुढे कल्याण म्हटलं कीं हाजी मलंग-शिवाय काहीही येत नाही.

रघू– इतिहास बघायला सुद्धा डोळे लागतात, तानाजी. इतराना दिसतात ते दगड-धोंडे अन् किल्ले-वाडे पण आम्हाला सबंध मराठी राज्य दिसतं. अहाऽहा ! ते कल्याण–तो कल्याणचा सुभेदार–ती लूटालूट–ती सुभेदाराची सून–तो खजिना–

ता– तो खजिना नाही, ती खजिना. जी आज तुझ्याकडे येतेय् कल्याणहून.

रघू–(मूडमध्येच) कल्याण म्हणजे संशोधनाला केवढी जागा.

ता– निदान त्यासाठी तरी तिच्याशी लग्न कर.

रघू– तानाजी, इतिहास संशोधन म्हणजे वर-संशोधन नव्हे.

ता– हल्ली वरसंशोधनच कठीण झालंय्. मुलीच्या बापानं कितीहि काळजीपूर्वक वरसंशोधन केलं तरी शेवटी भलताच जावईशोध लागतो. रघू माझं ऐक.

रघू– ते कालत्रयी शक्य नाही. निश्चय म्हणजे निश्चय. निश्चयाचा महामेरु–

ता– महामोरु आहेस महामोरु ! तिनं मला विचारलं असतं तर एकदाच काय पण छप्पन्न वेळा तिच्याशी लग्न केलं असतं.

रघू– एकदा निक्षून सांगितलं ना. मग असा घोरपडीसारखा चिकटू नकोस–

ता– (वैतागून) मी कुठं चिकटतोय्–ती कल्याणची घोरपडच–

रघू– ती घोरपड तूच गळयात बांधतोयस माझ्या–

[तेवढयात कु. खजिना घाईघाईनं आत येते. रागाने बेफाम झालीय्. पुन्हा मागे वळून पाहातेय्. पुटपुटतेय्–]

**खजिना** – (प्रवेश करून) निर्लज्य – हलकट–बेशरम–नालायक. (रघूला व तानाजीला वाटतं हा 'आहेर' आपल्यालाच) लाजसुद्धा वाटत नाहीत.

ता–(भीत भीत) खजिना, तुझा काही तरी गैरसमज होतोय आम्ही तुझ्याविषयी बोलत नव्हतो.

**खजिना** (दुर्लक्ष करून)– काही आयावहिणी आहेत कीं नाहीत ?

ता–तू निष्कारण त्रागा करते आहेस.

ख–याना पोलिसांच्या ताब्यात दिलं पाहिजे.

ता–हे बघ मी माझं कर्तव्य केलं. तू याला पोलिसाच्या ताब्यात दे नाहीतर तुझ्या ताब्यात घे.

ख–(अजून पारा वरच) आणि वर असा लोचटपणा कीं काही विचारू नका.

ता–खरं म्हणजे आम्ही सिंहगड–घोरपड यांवर बोलत होतो.

रघू–(चाचरत) होऽहो. खरंच तुमचा गै-गैरसमज झालाय्. मला तुमच्याविषयी–

ख–काहीसुद्धा गैरसमज झाला नाही. तो बरेच दिवस पाठीमागे लागलाय् माझ्या.

रघू–कोण ! मी ?

ता–अग हा तर इतिहासाच्या पाठीमागे लागलाय्.

ख– जीव नकोसा केलाय् (खिडकीतून बाहेर पहात) कल्याणपासून पाठलाग करतोय.

रघू (वैतागून)–अहो पण तो हरामखोर कोण हे सांगाल कीं नाही आधी.

ख– (थंडपणे) आपल्या वर्गातला तो सूर्यकांत पिसाळ.

ता– कोण सूर्यकांत पिसाळ ?

रघू– (मूडमध्ये) सूर्याजी पिसाळ ! हं ! असल्या घरभेद्यांना अन् समाजकंटकाना हत्तीच्या पायी दिलं पाहिजे.

ता–रघू– सध्या हत्ती बघायलासुद्धा मिळत नाही. तेव्हा असल्याना हत्तीच्या पायी देण्याऐवजी बाईच्या हातीच दिलेलं बरं.

रघू– जगदंब ! जगदंब !

ख– इश्श ! जगदंब काय ! खरं आहे ते.

ता– पण पिसाळासारख्या सुशिक्षितानं असं करावं म्हणजे–

रघू– सुशिक्षित माणूस सुसंस्कृत असतो असंच काही नाही. त्यात हा तर बोलून चालून पिसाळ !

ता–रघू, तो इतिहासातला पिसाळ नव्हे. हा आपल्या वर्गातला सूर्यकांत पिसाळ. हीरो नंबर वन् !

ख–प्रेमानं पिसाळलाय् मेला. रोज येता जाता छळतो. बसस्टॉप–रेल्वे स्टेशन–जिथं तिथं आहेच.

ता– पण तू त्याला स्पष्ट का सांगून टाकत नाहीस.

ख– केव्हाच सांगितलंय् मी त्याला. त्याची पहिलीच प्रेम कविता साभार परत केलीय् मी.

ख– म्हणूनच तो पिसाळलाय्.

ख–त्याला किती वेळा बजावलं तरी त्याची खोड काही जात नाही. बोलतो असा गोड–

रघू– असली माणसं अशीच असतात. बोलतात गोड पण असतात द्वाड. कुठे ती पराक्रमी पुरुषांची परंपरा ! इतिहास विसरलो आम्ही इतिहास.

ता– रघू, इतिहास स्मरण्यापेक्षा इतिहास घडवणं फार चांगलं नाही का ?

रघू– प्रेम जडवण्याइतकं इतिहास घडवणं सोपं नाही तानाजी. इतिहास घडवणं म्हणजे प्रत्यक्ष काळालाच थांबवणं.

ता–आधी त्या पिसाळाला थांबव. नाहीतर भलताच घोटाळा व्हायचा नि भलताच इतिहास घडायचा.

[इतक्यात 'मजनू'च्या अवतारात सूर्यकांत पिसाळ धावत येतो.]

**पिसाळ**– (प्रवेशून) कुठाय् ? कुठाय् माझी खजू ? माझी लाडकी खजू ! सांगा, कुणी तरी सांगा. खजू मिळेल का हो शेजारी ?

रघू– कोण, सूर्याजी पिसाळ !

पि–होय, मी तो. खजूच्या प्रेमापायी वेडापिसा झालेला सूर्यकांत पिसाळ तो मीच. (खजिनाला पाहून) हाय ! खजू तू आहेस ? मला वाटलंच. जिथं गुलाबाचा गंध दरवळतो तिथं तू असणारच. माझ्या गुलाबाच्या फुला, मी भुंग्यासारखा—

ता–(बाजूला) म्हणजे वास काढत आला हा शेवटी.

पि–खजू लाडके. माझं ऐक ! (तिच्यासमोर गुडघे टेकून) खजू, माझ्या प्राणांच्या प्राणा ! तुझ्यावांचून मी एकक्षणभर देखील जगणार नाही.

ता–मग आतापर्यंत जिवंत कसा राहिलास ?

पि–केवळ खजिन्यासाठीच !

रघू–प्रेमपिसाट पिसाळा, दुसऱ्याच्या घरात घुसून असा प्रेमहल्ला, अशी दगलबाजी करता–शरम नाही वाटत तुम्हाला ?

ख–रघू, रघू आधी याला बाहेर काढ बघू. मला याच्याशी काहीहि कर्तव्य नाही.

पि–पण मला तुझ्याशी आहे ना. खजू तू माझा जीव कीं प्राण आहेस.

ता–म्हणजे नक्की काय ? जीव कीं प्राण ?

पि–घोरपडे, प्रेमाची चेष्टा करू नकोस. खजूवर मी एफ्. वाय्. पासून प्रेम करतोय.

ता–म्हणजे एफ्. वाय्. पासून तू अभ्यास केलाच नाहीस तर ?

ख–तुम्हाला ते कळणार नाही. खजूच्या प्रेमासाठी खरं म्हणजे कॉलेजमध्ये राहिलोय.

ख.—ता–ख–काय !

पि–होय. त्याच त्याच वर्गात. (गुडघे टेकून) खजू माझा अन्त पाहू नकोस, अन्तःकरण पहा.

ख–मला तुझं तोंडसुद्धा बघायचं नाही. तुझ्यावर प्रेम ही गोष्ट अशक्य आहे.

पि–या जगात अशक्य असे काहीच नाही खज.

ख– पण मला तुझ्यावर प्रेम करता येणार नाही.

पि– पण कां ? कारण काय ?

ख– (लाजत) कारण माझं रघूवर प्रेम आहे.

पि– हे रघूवरचं प्रेम आंधळं आहे. वेडेपणा करू नकोस. रघूपेक्षा माझंच तुझ्यावर जास्त प्रेम आहे.

ता– (वैतागून) रघ्या, अरे तू काही तरी बोल ना.

रघू– या हरामखोराशी मी काय बोलणार ?

ता–रघू विसरतोयस तू. अरे निवडणुकीत आणि प्रेमात भरपूर बोलावं लागतं– भरपूर आश्वासनं द्यावी लागतात. भरपूर थापा माराव्या लागतात. अरे प्रेमात काय अन् निवडणुकीत काय मुक्या उमेदवाराचं डिपॉझीट जप्त होतं समजलास.

पि–खजू लाडके ! हा रघू तुझ्यावर काय प्रेम करणार. उलट तुला मी अगदी फुलासारखी ठेवीन.

ता–म्हणजे फुलदाणीत ठेवणार काय तिला ?

पि–खजू– किती वेळ वाट पाहू ? चल खज आधी आपण प्रेम करू–मग लग्न करू–मग काश्मिरला जावू–

ता–काश्मिरला !

पि–हो काश्मिरला. हनिमूनसाठी–झेलमच्या काठी–गुलाबाच्या ताटव्यात–सुरुंच्या गारव्यात–अहाऽहा ! खजू किती दिवस ते स्वप्न पाहतोय. (स्वप्न पहातो) झेलमच्या कांठी मी उभा आहे– तू शिकाऱ्यात उभी आहेस. काठावर तुझ्या गालासारखी सफरचंदं आहेत. तर शिकाऱ्यात तुझे गाल सफरचंदांसारखे आहेत. तुझा शिकारा हळू हळू काठाला येतोय. मग मी तुला अलगद फुलासारखी उतरवून घेतोय. अहाहा ! तुझे नाजुक हात म्हणजे सुरुंच्या फांद्या न् बोटे म्हणजे सूचिपर्णाची पानं– पण कशी रेशमासारखी मुलायम– तो स्पर्श त्या गुलाबी थंडीत कसा हवा–हवासा वाटतो. खजू–खजू तुला ते स्वप्न दिसत नाही का ग ?

ता–(वैतागून) तिची झोप उडालीय मग स्वप्न कसं दिसणार ?

पि–(तोच मूड) खजू तू शिकाऱ्यात–मी झेलमच्या काठी. गुलाबांच्या ताटव्यात गुलाबी गोष्टी– (हात हातात घेतो)

ख–(झिडकारून) रोज मेलं तेच तेच. कान किटले माझे. एका शब्दाचा बदल नाही. रघू या जाचातून सोडव मला एकदाची.

पि–विचार कर खजू. हा रघू तुझ्यावर कसा प्रेम करणार. हनिमून-साठी हा तुला काश्मिरला नेईल का ? (हसतो) अग तो तुला शनिवारवाड्यात किंवा सिंहगडावर घेऊन जाईल.

रघू–अहाऽहा ! सिंहगड ! रायगड ! अशी एकेका गडांची नांवं ऐकली कीं वाटतं रोज हे गड हसत हसत चढावेत अन् खेळत खेळत उतरावेत.

ता–रघू, हसत खेळत चढउतार करायला गड म्हणजे तुला चाळीचे जिने वाटतात काय? साधा जिना चढताना जीव नकोसा होतोय आणि

रघू– तानाजी माझं एक ते फार गोड स्वप्न आहे रे.

ता– मला तमाशा काढावा !



## नांव ठेवायला जागा नाही!

विनायकरावांचा रेडियोचा बिझिनेस होता. एका माणसाने त्यांच्याकडून रेडियो घेतला, पण दोन वर्षे होऊन गेली तरी पैसे दिले नाहीत. बरीच पत्रे लिहूनहि त्याने दाद दिली नाही. तेव्हा शेवटी विनायकराव भडकले आणि त्यानी त्याला एक खरमरीत पत्र लिहावयाचे ठरविले.

तासाभराच्या प्रयत्नानंतर त्यानी पत्र लिहून पुरे केले आणि सरस्वतीबाईंच्या हाती देऊन ते म्हणाले, "हे वाचून पहा. भाषा फार जहाल नाही ना ?

सरस्वतीबाईनी पत्र वाचून पाहिले आणि त्या म्हणाल्या, "फार सुंदर लिहिलं आहात. नांव ठेवायला एऽवढी जागा नाही. मात्र तीन दुरुस्त्या कराव्या लागतील. 'हलकट' हा शब्द 'हलकट' असा लिहायला पाहिजे, 'पाजि' मधली 'जि' दीर्घ हवी आणि 'बदमाश' मधला श पोटफोड्या हवा, शेंडीफोड्या नको.

–वि. रा. भाटकर

रघू– (दुर्लक्षून) मला लहानपणापासून वाटतंय की आपण या गडावरून त्या गडावर उड्या मारीत फिरावं. तलवार हातात घेऊन चार वार करावेत. सारा मराठी प्रदेश पायांखाली मनसोक्त तुडवावा. डोळे भरून बघावा. रानवाऱ्यांसारखं जंगला–जंगलातून फिरावं आज रायगड तर उद्या सिंहगड, परवा तोरणा तर तेरवा–

पि–(मध्येच) पण खजू तुझ्या नाजुक कोमल देहाला सिंहगड चढवेल का ?

ता–त्याची काळजी तुला कशाला ? ती नाही चढली तर रघू चढेल.

रघू–जगदंब ! जगदंब !

ता– वंध्या! जगदंब काय करतोयस? तिला घाल पाठीशी अन् खुशाल चढ सिंहगड.

पि– पण खजू, हनिमूनसाठी सिंहगडावर कोण जाईल का ? कुठे काश्मिरसारखं नंदनवन अन् कुठे सिंहगड !

रघू–(कल्पना सहन न झाल्याने) खामोश ! प्रेमाचे चाळे सिंहगडावर ही कल्पनाच मला भयंकर वाटते. त्या परम पवित्र सिंहगडावर श्वानांची लंपटता—

ता–रघू तुझी गाडी भलतीकडेच चाललीय्. जरा माणसासारखं सरळ बोल. रघू वेळ वैऱ्याची आहे. जरा विचार कर. हा पिसाळ काय म्हणतोय. ही खजिना तुझ्याकडे कां आलीय? आळश्यांवर गंगा यावी तशी ती तुझ्याकडे आलीय अन् तू–

पि– खजू लाडके अजून विचार कर. तुझ्या हौशी, तुझ्या इच्छा, तुझ्या आकांक्षा–तुझी ध्येये हा रघु कसा पुरविणार? उलट तुझ्यासाठी काय वाटेल ते करीन. तुझ्यासाठी त्या निळ्या सरोवरातील सोन्याची कमळं आणीन–नाकातील चमकीसाठी आभाळातील चांदणी तोडन आणीन–तुझ्या साडीसाठी शुभ्र धुक्याचं नायलॉन आणीन. तुझ्या केसात माळायला सकाळच्या कोवळ्या उन्हाचे झुबके आणीन–बोल तुझ्यासाठी मी काय काय आणू? तू नुसता शब्द टाकून पहा. हा मी निघालोच—

ख.–रघूबरोबर जे मिळेल त्यातच मला समाधान आहे.

पि.–अग पण इतिहास सोडून तो तुझ्याबरोबर प्रेम करणार कधी? प्रेमाच्या गुलाबी मसलतीऐवजी हा तुला पहिल्या रात्री लढाईची कारणेच शोधीत बसलेला आढळायचा. म्हणजे जन्मभर तुझ्या नशिबी शीतयुद्ध !

ता (वैतागून)–रघू, अरे तू काही तरी बोल ना! असा मुखस्तंभासारखा आकाशात काय बघतोस ?

ख.–रघू याला आधी बाहेर काढ बघू. मला याची भीति वाटते.

पि.–खजू, तुला माझी भीति वाटते ! अग तुझ्या प्रेमासाठी मी कसा गरीब गाय झालोय.

ता.–पिसाळा, असल्या शब्दजालात तिला फसवू नकोस. मुकाट्याने बाहेर जा.

पि.–प्राण गेला तरी खजिनाशिवाय मी इथून जाणार नाही.

ख.–म्हणजे मेल्यावर सुद्धा हा छळणार मला.

पि.–खजू, बघ तुझ्यासाठी मला प्राणाची देखील पर्वा नाही. क्षण एक मिळो प्रेमाचा, वर्षाव पडो मरणांचा.

रघू–हाच निर्धार तू देशासाठी केलास तर तुझा प्राण तरी सत्कारणी लागेल. देशासाठी सुंदर तरुणीचा त्याग करणारे ते वीर कुठे–

ता.–पण कधी कधी सुंदर ललनेसाठी राज्यत्यागच काय पण देशत्यागसुद्धा करावा लागतो रघू.

रघू.–देशासाठी प्रेमावर पाणी सोडणारे ते वीर आठवले कीं वाटतं त्यांच्यासारखंच आपणही फकीर व्हावं आणि जीवाचं सोनं करावं.

पि–बघ खजू अशा भणंग फकिराशी लग्न करून तू तुझ्या सौंदर्याची राख करणार काय?

ख.–रघूच्या प्रेमासाठी माझी राख झाली तरी चालेल.

पि.–खजू असं बोलू नकोस ग. मी तुझ्यासाठी काय करू म्हणजे माझा तुला विश्वास वाटेल.

ता.–तिच्यासाठी तेवढा बाहेर जातोस का? रघ्या, तुझा इतिहास गेला कुठे? हा पिसाळ माझ्या खोलीत असता तर याला धक्के मारून बाहेर काढला असता. काही पुरुषार्थ–

रघू.–या स्त्रीलंपटापुढे कसला आलाय पुरुषार्थ. इतिहासात स्त्री-प्रेमासाठी लढाया झाल्यात. पण तेथे पराक्रम होता. पुरुषार्थ होता.

ता.–तेच तू विसरतोयस. एक सुंदर ललना दुर्जनापासून बचाव व्हावा म्हणून तुझ्याकडे येते काय आणि तू मात्र–

रघू–पिसाळा, मुकाट्यानं चालता हो. आतापर्यंत तुझी चर्पटपंजरी खूप ऐकून घेतली. अन् कळून चुकलं की तू एक वाट चुकलेला वेडा आहेस. तुझे शब्द म्हणजे केवळ पाण्याचे बुडबुडे. माझ्या देशाला तू कुचकामाचा वाटतोस. काही चाड असेल तर मुकाट्यानं बाहेर जा. कारण–कारण ही खोली माझी आहे

**पि.**–खोली तुझी असेल पण खजिना माझी आहे. मात्रं तिच्यावर प्रे ऽऽऽम आहे.

**ख.**–पण माझं रघूवर प्रेम आहे.

**पि.**–खजू, पुन्हा तुझं तेच. या मूर्तिमंत रसिकाला नाकारून तू ह्या रूक्ष माणसावर प्रेम करणार ? अग सौंदर्य भोगायला देखील माणसाजवळ रसिकता असावी लागते. खजू, तुझ्यासारखी सुंदर तरुणी मी आयुष्यात पाहिली नाही.

**ता.**–पिसाळा आधी तुझ्या आयुष्यात पोरी आल्या किती ? उगाच थापा मारू नकोस.

**पि.**–खज, तू ह्याचं काही देखील मनावर घेऊ नकोस. याना प्रेम कशाशी खातात हे काय ठाऊक ? खजू, या जगात एकच वस्तु सुंदर आहे आणि ती म्हणजे स्त्री. स्त्री नसेल तर बाकीच्या सौंदर्याला विचारतो कोण? स्त्रीविना हे जग अक्षरशः जन्मठेप आहे, जन्मठेप. त्यात तुझ्यासारखी सुंदर स्त्री मिळाल्यास या जन्माचं सार्थक होईल. खज, खरंच तुझ्यासारखी सुंदर स्त्री अख्ख्या दुनियेत नसेल.

**रघू**–(येथन वातावरण बदलत जाते) खरंच खजिना, खोटं कशाला बोलू. खरोखरंच तू फार सुंदर आहेस.

**ता.**–शाब्बास रघू! शहाण्यासारखं बोललास. बोल रघू, तू असाच बोलत रहा.

**रघ**–(मूडमध्ये) खजिना, ब्रह्मदेवानं तुला निर्माण करताना मोठं कसब वापरलं असावं. आम्हालाच काय पण तुझ्या अप्रतिम सौंदर्य कुणालाही वेड लावील.

**ख.**–(अत्यानंदाने) खरंच! रघू आज मला कित्ती कित्ती बरं वाटलं. रघू, तुझ्या असल्याच शब्दांसाठी माझा प्राण आसुसला आहे. तू असं काही बोलावस असं किती वाटायचं मला. रघू, आज मी माझं हृदय तुझ्या पायावर ठेवणार आहे. रघू, खरंच मी तुला सुंदर वाटते ?

**रघू**–(मूड कायम) होय खजिना, तू लावण्यवती आहेस. मी प्रथम जेव्हा तुला पाहिलं तेव्हा मला मूर्तिमंत सौंदर्याचा साक्षात्कार झाला. मी कितीतरी वेळ तुझ्याकडे पहात होतो. निसर्गानं निर्माण केलेल्या तुझ्या सुंदर पण मंगल कलाकृतीकडं मी डोळे भरून बघत होतो. तुझ्या डोळ्यात चंद्र, तर भाळी आभाळ. केसात आषाढ मेघ तर गाली तांबट पहाट. बोलीत रानवारा तर चालीत रानझरा. भान कसं हरपून गेलं माझं. आणि जगात अशी सुंदर व मंगल वस्तु निर्माण करणाऱ्या ब्रह्मदेवाचे आभार कसे मानायचे हेच सुचेनासं झालं मला.

**ख.**–रघू, आज मी स्वप्नात तर नाही ना ?
**ता.**–रघू, आगे बढो. बोल तू, नुसता बोलत रहा.
**रघू**–(गंभीरपणे) हे सौंदर्यवति!
**ख.**–काय रघुनाथा ?

**रघू**–तुला पाहून आमच्या मनात एकच सुंदर विचार आला. मनात आलं.... ?
**ख.**–काय मनात आलं...?

**रघू**–मनात आल की हे सौंदर्यवती, तुझ्यासारख्या जर आमच्या मातोश्री असत्या तर. . .तर आम्हीसुद्धा सुंदर झालो असतो.
**ख.**–(किंचाळून) म्हणजे ? (भोवळ येऊन पडते)

**ता.**–(कपाळावर हात मारून) म्हणजे– इतिहास, इतिहास! सत्यानाश! रघ्या, तू काय बोलतोयस हे तुला तरी कळतंय का? रघू तू आधी शुद्धीवर ये.

**रघू**–होय तानाजी, आम्ही पूर्ण शुद्धीवर आहोत. छत्रपती देखील एकदा असंच म्हणाले होते.

**ता.**–रघ्या, इतिहास नडला तुला शेवटी. कुठे छत्रपती अन् कुठे तू रघ्या! लेका, तुला खजिनापति व्हायचंय.
**रघू**–जगदंब! जगदंब! परस्त्री आम्हाला मातेसमान आहे.
**ता.**–पण ही परस्त्री नाही. ही तुझीच आहे.
**रघू**–ते अशक्य आहे. आज देशाला—

**ख.**–(शुद्धीवर येत) काय? काय ऐकते मी? याचा अर्थ काय समजायचा मी ?
**पि.**–(हसून) अर्थ अगदी स्पष्ट आहे.
**ख.**–माझ्या प्रेमाचं हेच का साफल्य?
**पि.**–साफल्य कसलं, निर्माल्य म्हण! निर्माल्य!! तरी मी सांगत होतो खजू तुला.....
**ख.**–हीच का माझ्या प्रेमाची किंमत? केवळ तुझ्या...इतक्या दिवस राहिले त्याचं हेच का फळ शेवटी–

**ता.**–रघ्या, मला सुद्धा तोंडघशी पाडलस. अजून विचार कर. इतिहासाचं वेड जरा बाजूला ठेव.
**रघू**–निश्चयाचा महामेरु !

**पि**–पाहिलंस खजू, झाली तुझी खात्री? चल हा तुझ्या प्रेमाचा पुजारी तुला बोलावतोय. चल आधी प्रेम करू–मग लग्न करू–मग काश्मीर-उटी–सिमला–झेलमच्या काठी–गुलाबाच्या ताटव्यात गुलाबी गोष्टी–

**ख**–सूर्याजीराव नका बोलू–पुढचं सार पाठ आहे मला. आता डोळे उघडले माझे. गाढवापुडे गीता वाचली मी. येथे क्षणभर देखील राहयला नको. चला आधी प्रेम–मग लग्न–मग काश्मिर–सिमला–उटी–
**पि**–(खुशीत) झेलमच्या काठी–गुलाबी गोष्टी–(दोघंहि हातात हात घालून बाहेर जातात)

[ रघू ताठ खडा आहे. तानाजी कोसळलेला ]

**ता**–काश्मिर–उटी–सिमला. रघ्या आता बोंबला. तुला कवडीची अक्कल नाही. लेका गडहि गेला अन् सिंहहि गेला. एवढा इतिहास वाचून त्याचा काय उपयोग? आपली तर बुवा सिंहगडावरून कोसळल्यासारखीच अवस्था झालीय्.

**रघू**–(गंभीर) ध्येयवादी पुरुषांचा इतिहास–

**ता**–इतिहास, इतिहास–खड्डयात गेला. लेका दुश्मन घरात घुसतो काय अन् गड सर करून जातो काय? हल्ली तुझ्या ध्येयवादाला विचारतो कोण? आज ध्येयवादापेक्षा देहवादाला जास्त किंमत आहे.

**रघू**–याचा अर्थ आम्ही जे विसरायला नको तेच विसरलोय. आज राष्ट्रभक्तीची निकड आहे. आज देशाला छत्रपतींची गरज आहे.

**ता**–पण आजकालच्या पोरींना छत्रपतिपेक्षा सूर्याजी पिसाळच पाहिजेत, त्यांचं काय?
**रघू**–ती चूक सुधारली पाहिजे. कारण आधी राष्ट्रप्रेम–
**ता**–तुझं बोडकं–
**रघू**–(तार चढत आहे)

**आधी शिवरायाचे आठवावे रूप**
**शिवरायाचा आठवावा प्रताप**
**शिवरायाचा आठवावा साक्षेप**
**भू मंडळी।**

**ता.**–जय जय रघुवीर समर्थ!
[ असे म्हणून तानाजी रघूपुडे साष्टांग नमस्कार घालतो. ]

• • •

**[ पडदा ]**

[एकांकिकेचा प्रयोग करावयाचा असल्यास लेखकाची परवानगी घ्यावी ]

# अश्रूंचे आरत्कत

[ उत्तरार्ध ]

**रिअर-ॲडमिरल** एस्. जी. करमरकर [निवृत्त]

**...सैन्यवाहिकेचे कप्तानपद स्वीकारण्यापूर्वी लेफ्टनंट (सेवानिवृत्त रिअर ॲडमिरल) एस. जी. करमरकर यानी तांबड्या समुद्रात गाजविलेली कामगिरी नौदल दर्शन विशेषांकात आपण वाचलीत.**

**उत्तर पूर्व आफ्रिकेत जर्मनी व इटालीच्या पाडावासाठी झालेल्या लढाईसाठी ठिकठिकाणी उत्तरपूर्व किनाऱ्यावरसुद्धा सैन्य उतरविण्यात आले. त्याची ही चित्तथरारक हकीकत.......**

**एलफिसमुळे** ओढवलेले गंडांतर उलटून काही दिवस गेले. तोपर्यंत एडन केंद्रात 'रत्नागिरी' चांगली रुळली होती. आमच्या हॉकी संघानेही नाव कमावले होते. सारांश, कानेकोपरे धासून गेल्याने त्या भागातील नौदल हालचालीत आम्ही चपखल बसलो होतो.

पोर्ट सैद येथे नेहमीप्रमाणे कामगिरीवरून परत आल्यानंतर एकदा आम्हाला बहात्तर तासांची पूर्ण सुट्टी होती. सुट्टीच्या दुसऱ्या सायंकाळी मला ड्रिंक्स व उपहाराच्या एका पार्टीचे आमंत्रण कॅप्टन गनकडून मिळाले. किनाऱ्यावर मोटार तयार होतीच. तेथे आणखी एक सद्गृहस्थ वाट पहात होते. मी येताक्षणी त्या अनामिकाने ओळख करून दिली. तो होता नौदल गुप्तहेर खात्याचा लेफ्टनंट जॉन जे. कॉलव्हिल. मोटार सुरू झाली. एडनचे उपनगरही मागे पडले. राहून राहून विचार येत होता की आपण चाललो आहोत तरी कुठे ? पण कॉलव्हिलचा नूर पाहिल्यावर गप्प बसणेच मला श्रेयस्कर वाटले.



आम्ही पोर्ट सैदच्या दक्षिणेस तीस मैलांवरील शुआकिन बंदरात प्रवेश केला. तुर्की राजवटीतील ते एक पुढारलेले बंदर होते. बंदराभवती गोलाकार डोंगर पसरल्याने आगबोटींना व गलबतांना वारावादळाचा त्रास बिलकुल होत नव्हता. तेथील एका बंगल्यात मोटार शिरली.

बरोबर ७-३० वाजता फ्रेंच स्वातंत्र्य सैनिकांचे वरिष्ठ अधिकारी तसेच खार्टुम येथील लष्करी-छावणीतील वडे अधिकारी जमा झाले. (वैराण वाळवंटाची रुक्षता थोडी कमी व्हावी म्हणूनच की काय काही "रेन्स" (वुमन्स रॉयल नेव्हल रिझर्वमधील महिला) सेक्रेटरीज तेथे होत्या. पेयपानाला सुरुवात झाल्यानंतर मला असे आढळले की सर्वांची नजर काहीशा विस्मयाने पण बऱ्याचशा कुतूहलाने माझ्यावरच खिळली होती. फ्रेंच स्वातंत्र्य सैनिक संघटनेच्या शिपायाना इरिट्रियाच्या किनाऱ्यावरील विवक्षित ठिकाणी उतरविण्यासाठी एका वेगळ्याच नौकेचा कप्तान म्हणून माझा परिचय करून देण्यात आला. साहजिकच माझ्या अंगावर मूठभर मांस चढले. थोड्या फार गप्पा झाल्यानंतर पाच अतिवरिष्ठ अधिकाऱ्यांसह मी एका स्वतंत्र खोलीत गेलो. तेथे माझी कामगिरी मोघमपणे समजावून देण्यात आली. बरोबरीचशी गुप्त माहितीही मिळाली. सर्वांच्या सदिच्छा स्वीकारून रात्री ८-३० ला आमची स्वारी मोठ्या खुशीत बोटीवर परतली.

दुसऱ्या दिवशी पोर्ट सैदच्या नेव्हल ऑपरेशन्स केंद्रात त्या सफरीचे दृष्टीने शत्रु-मित्र हालचाली व सामर्थ्य यांची

अनुक्रमणिका

माहिती, नकाशे, छायाचित्रे, गुप्त कागद-पत्रे, गुप्त सांकेतिक संदेश आदीच्या गराड्यात मला सोडून कॅप्टन गन ९-३० ला तेथून बाहेर पडले. मला मार्गदर्शन करण्यासाठी कॉलव्हिल मात्र होता. त्या गडबडीत एक केव्हा वाजला तेही कळले नाही. "कम ऑन ओल्ड बॉय, अरे काही जेवणाखाणाची शुद्ध?" असे म्हणत कॅप्टन गनने पाठीवर थाप मारली तेव्हाच मी आणि कॉलव्हिल दोघेही परत माण-सात आलो..... जेवण व विश्रांति-नंतर पुन्हा जी बैठक मारली ती योजना नक्की आखून व कॅप्टन गनची अनुमति घेऊनच आम्ही बाहेर पडलो. रात्री 'रत्नागिरी'वर छोटासा निरोप-समारंभही झाला. योगायोग असा की मी 'रत्नागिरी' सोडल्यानंतर काही महिन्यानी तिला त्याच भागात जलसमाधि मिळाली. चालायचेच. त्याला इलाज नसतो.

सैन्य उतरविण्यासाठी आम्ही मेर्सा-टकलाई हे ठिकाण निवडले होते. तेथे जाणारा जलप्रवाह खोल परंतु अरुंद होता. ठिकठिकाणी खडक आणि वाळूचे पुंजके पाण्याखाली दडले होते. भरीत भर इटालियन पाणसुरुंगांची पेरणी. तशातच त्या जलमार्गाच्या मुखापासून मसावा अगदीच जवळ होते. त्यामुळे जबाबदारी वाढली होती. माझ्या कंपनीशिवाय सैनिकांच्या प्राणरक्षणाची, त्यांच्या खाण्या-पिण्याची, शस्त्रास्त्रांची काळजी घेणे शेवटी मलाच भाग होते. दिमतीला जरी त्यांचे अधिकारी होते, तरीही अखेर ते पडले भूदलाचे सैनिक. सागराचा लहरी स्वभाव नि शत्रूच्या पाणबुड्यांचा, पाणसुरुंगांचा उच्छाद याला ते काय कपाळ करणार? तापात ताप म्हणजे प्रयाणाच्या आदल्या दिवशी पेट्रोलचे दोन गॅलनचे आठशे रिकामे डबे गोळा करून ते त्या सेनेच्या प्रमुखाचे हवाली करण्याचा नसता उपद्व्याप आमच्या माथी मार-ण्यात आला. सुदैव इतकेच की नौदल पोलिसांच्या हातोटीमुळे ते काम व्यवस्थित-पणे पार पडले. 'तेवढे डबे कशाला



रिअर–ॲडमिरल
एस. जी. करमरकर

हवेत?' या माझ्या प्रश्नाला मात्र तेव्हा कोणीच उत्तर दिले नाही. मीही नाद सोडला. मनात म्हटले, डबे जर हवाबंद असतील तर तशीच वेळ आल्यास जीव बचावण्यासाठी तरी उपयोगी पडतील.

माझ्या आगबोटीवर फ्रेंच सैनिकांची जी बटालियन होती तिने महायुद्धाचे प्रारंभापासूनच चांगली कामगिरी बजाव-लेली होती. त्यात सुमारे एक हजार सैनिक होते. ती फक्त नावालाच फ्रेंच बटालियन होती. कारण फ्रेंचांप्रमाणेच निग्रो अधिकारी, तसेच युरोपमधील सर्व नाझी विरोधी राष्ट्रांतील लोक, फार काय तीन अमेरिकन अधिकारी सुद्धा त्या बटालियनमध्ये होते. नव्हते ते फक्त भार-तीय शिपाईच. पोर्ट सैद ते शुआकिन हा प्रवास फक्त रिकाम्या बोटीनेच केला. तेथे त्या सैनिकानी बोटीत पाय ठेवला. शुआकिनपासून मसावापर्यंतच्या प्रवासात मला मार्गदर्शन व मदत करण्यासाठी ग्रीक कॅप्टन मॅगलिव्हेराज याला दिमतीस देण्यात आले होते. कॅप्टन मॅगलिव्हेराजला त्या दर्याच्या लाटेन्लाटेची पूर्ण माहिती होती. त्याच्या बहुमोल साह्यामुळेच मी त्या टापूत अनेकवेळा शत्रूच्या तडाख्यातून सहीसलामत निसटू शकलो. शुआकिनला चोवीस तास थांबलो. तेवढ्या वेळात सैनिक व त्यांची सामग्री व्यवस्थितपणे लावण्यात आली. दुसऱ्या दिवशी शाही नौदलाच्या 'फ्लॅमिंगो' या मध्यम प्रतीच्या युद्धनौकेची (फ्रिगेट) सोबत घेऊन आम्ही पाणी कापण्यास सुरुवात केली. शुआकिन ते मेर्सा-टकलाई हा जलप्रवास वर नमूद केलेल्या कारणाने अतिशय अवघड व धोक्याचा होता. पण 'एस्. जी.'वर 'स्नॉर्स'चा विश्वास होता. म्हणूनच त्यानी निर्धास्त-पणे माझी निवड केली होती. मार्गातील पाणसुरुंग नष्ट करण्यासाठी मला एक पाणसुरुंग–विनाशिका (माइनस्वीपर) देण्यात आली होती. ती पुढे, आमची स्वीट लिली (माझ्या आगबोटीचे नाव) मध्ये आणि आम्हाला समांतर परंतु निम्म्यात्र अंतरावर फ्लॅमिंगो अशी ती रचना होती. गुप्त माहिती फुटल्याने वा अन्य प्रकारे शत्रूला सुगावा लागल्यास तसेच पाणबुड्यानी आम्हाला हेरल्यास 'स्वीट लिली' सुखरूप नांगर टाकेल अशी दक्षता घेण्याची जोखीम फ्लॅमिंगोवर होती. ठरल्याप्रमाणे प्रवास सुरू झाला आणि दुसऱ्याच दिवशी पाणसुरुंग–विना-शिका 'अलकबीर' एका भुसभुशीत खड-कात जाऊन रुतली. तिच्या मदतीला जाण्याचा निर्णयही मी घेतला. पण एकाएकी आकाशातून बॉम्बफेक सुरू झाली. आकाश निरभ्र असल्याने ती विमाने आम्ही पाहू शकलो. आणि म्हणू-नच वेड्या वाकड्या गिरक्या घेऊन 'स्वीट लिली' अखंड राहिली. तीच 'रत्नागिरी' असती तर...या कल्पनेनेच माझे अंग शहारले कारण एकच बॉंब तिचा सत्यानाश करण्यास पुरेसा होता. तेवढ्यानेच भागले का? मुळीच नाही 'स्वीट लिली'च्या गोदामात विमानां-साठी तीव्र ज्वालाग्राही पेट्रोल भरलेले होते. आणि मेर्सा–टकलाईपासून जवळच उभारण्यात येत असलेल्या विमान केंद्रा-साठी ते नेण्यात येत होते. बॉंबफेक सुरू झाली. एकंदर परिस्थितीचा विचार करून मी अलकबीरला तिच्याच दैवाचे हवाली



अनुक्रमणिका

करून माझ्याच रक्षणाकडे सारे चित्त एकवटले. त्यातून पारही पडलो. दरम्यान शाही विमानांनी आकाशात झेप घेऊन छत्र धरण्यास सुरवात केल्याने 'अलकबीर'ही बचावली. अगदी खाली येऊन इटालियन वैमानिकांनी बाँबफेक केली असती, तर मात्र आमची खरोखरच घडगत नव्हती. पण मारणाऱ्यापेक्षा तारणारा बलवान असतो हेच खरे.

दरम्यान फ्लॅमिंगोचेही संरक्षण दुरावले. कारण आम्ही आता अगदीच उथळ पाण्यातून व अरुंद प्रवाहातून चाललो होतो. तेथून प्रवास करणे फ्लॅमिंगोला तिच्या आकारमानाने शक्यच नव्हते. अखेर एकदा सुखरुपपणे मेर्सा–टकलाई गाठले. तोवर तेथे शत्रूच्या असलेल्या तोफखान्याचा व छोटया मोठया लढाऊ बोटींचा विध्वंस विमानदलाने पद्धतशीरपणे केला होता. 'अलकबीर'ची साथ तुटल्याने ठायी ठायी पाणसुरुंग हेरीत अतिशय सावकाशपणे, सावधगिरीने मला तो प्रवास पुरा करावा लागला. येथेही नशिबच शिकंदर. म्हणूनच पाणसुरुंगांच्या जाळ्यातून मी निसटू शकलो. थोड्याच वेळात 'फ्लॅमिंगो'ही तेथे येऊन पोहोचली.. त्यामुळे तर मी निर्धास्त बनलो.

## लालच लाल झालेले डेक

किनारा तर गाठला. पण पुढे? सुमारे एक हजार सैनिक व त्यांचा लवाजमा उतरविण्यात अडीच तास मोडले. आणि हे सर्व संपूर्ण अंधारात काडीसुद्धा न ओढता पार पाडावे लागते. फक्त बोटीच्या कठड्यांपाशी आणि किनाऱ्यावर जेथे पडाव टेकत तेथेच अतिमंद दिवे होते. त्यांचाही उजेड पाच फुटापेक्षा जास्त दूरवर पडतच नव्हता. अशा तऱ्हेने ते दिव्य पार पाडले व दुसऱ्या एका खोल खाडीतून आम्ही पोर्ट सैदला परतलो. दरम्यान सकाळ झाल्यावर बघतो तो सारे डेक लालच लाल! त्या आठशे डब्यात फ्रेंचांनी शेरी भरली होती. आणि लँडिंगपूर्वी पिण्याच्या धांदलीत सबंध डेकभर तिचे ओघळ पसरले होते. "स्वीटलिली" या नावाप्रमाणेच चांगल्या असलेल्या त्या डेकची ती दशा पाहून आमच्या खलाशांनी त्या फ्रेंच लीजनच्या शिपायाना मनसोक्त शिव्या दिल्या खऱ्या. पण पुढे कित्येक महिन्याच्या घासपुसीनंतरच 'स्वीट-लीली'चे डेक्स पूर्ववत् बनले.

पोर्ट सैदला पोहोचल्यावर असे कळले की बाँबफेक झाली त्याच दिवशी दोस्त सैन्य उतरणार असल्याची बातमी शत्रूला मिळाली होती. स्वाभाविकच उंच अंतराळात घिरट्या घालणाऱ्या इटालियन बाँबफेक्या विमानांना वाटले कीं 'अलकबीर' हीच सैन्यवाहिका असावी. म्हणून त्यानी मनमुराद बाँबफेक केली होती. परंतु स्वीट-लिली तेथून काहीशा अंतरावर होती हे एक. व मेर्सा–टेकली येथे सैन्य उतरेल अशी नक्की माहिती शत्रूला नव्हती हे दुसरे. त्यामुळे तेथील सर्व साहित्य तसेच पेट्रोलचा साठाही सुरक्षित राहिला.

बाब–अेल मंडेलब आणि एकंदरीत तांबडा समुद्र व एडनचे आखात यांच्या परिसरात एक फार मोठे संकट सदैव भेडसावीत असे. तेथील सर्वच खाड्यांतून फ्लॅमिंगोसारख्या मध्यम युद्धनौका जाऊच शकत नव्हत्या. त्यामुळे त्यांच्या उत्तम

प्रकारच्या विमान-विध्वंसक तोफांचे संरक्षण आम्हाला कधीच मिळू शकले नव्हते. 'रत्नागिरी'सारख्या कनिष्ठ दर्जाच्या युद्धनौकेवरील तशा तोफा अत्युच्च उंचीवरील विमानांचा वेध घेण्यास उपयुक्त नव्हत्याच. त्यामुळे यदाकदाचित एकाद्या वैमानिकानेही खूप खाली येऊन कौशल्याने बाँबफेक केली असती तर अशा कित्येक युद्धनौकांची केव्हाच वाट लागली असती, अखेर अक्कलदेखील वापरता आली पाहिजे हेच खरे.

## तर शिपायांचे काय होईल...?

एका फेरीत 'स्वीट-लिली' ने ४/१६ व्या पंजाव वटालियने सैनिक कामगिरीवर निघाले होते. कर्नल लव्हेंडर हा होता सर्वाधिकारी. तो पठ्ठ्या बहुतेक सर्व वेळ ब्रिजवरच काढीत असे. त्यामुळे त्याच्या शिपायांचे जीव वांचविण्यासाठी काहीतरी उपाययोजना असेल एवढीच जाणीव त्याला होती. नी तेवढ्यासाठी लाइफ–जॅकेट वापरतात हेही त्याला कळलेले होते. पण शेवटी तो पडला कर्नल. त्यातही भारतासारख्या विस्तीर्ण देशात खुष्कीची नोकरी केलेला. झाले काय की उतरण्याच्या गडबडीत एकाही जवानाने लाइफ–जॅकेट अडकविलेले नव्हते. त्यामुळे कर्नलसाहेब तापले. त्यानी विचारले, 'एस्. जी. बोट बुडाली असती, तर काय झाले असते रे यांच्या जिवाचे?' 'बुडून मेले असते. दुसरे काय? ते आले आहेत मरण्यासाठीच. फरक इतकाच की त्याना जलसमाधि मिळाली असती–' मी तितक्याच शांतपणे, पण मनातल्या मनात कर्नलच्या अज्ञानाला हंसत उत्तर दिले. वस्तुस्थिती अशी होती की प्रत्येकाला लाइफ–जॅकेट दिलेले होते. ते वापरण्याच्या योग्य त्या सूचनाही देण्यात आल्या होत्या. मात्र त्याची–रंगित तालीम घेणे मला वा माझ्या अधिकाऱ्याना शक्यच नव्हते.

माझ्या थंडपणाने लव्हेंडर अधिकच भडकला; पण गप्प उभा राहिला....पुढे एके दिवशी ब्रिगेडियर बॉस, (मराठा रेजिमेंट) या एडनमधील सबअेरिया कमांडरने मला बोलावणे धाडले.

"हा काय चावटपणा आहे?" ब्रिगेडियर बॉसने मला दमातच घेतले?

"काय झाले सर?"

'मलाच विचारतोस? कर्नल लव्हेंडरचे हे पत्र वाच. मग सांग, जे सांगायचे ते.'

मी ते पत्र वाचले नि कपाळावर हात मारला.

'आता कां?' –ब्रिगेडियर बॉस

'सर–हसावे की रडावे तेच कळत नाही. बोटीच्या आढ्याला सर्व लाइफ–जॅकेट्स् अडकवलेली होती. सर्व शिपायाना ती घालता येत असत. पण हे जोकं देच. मला तुम्हीच सांगा की कॅप्टन गनभारखा साता समुद्राचे पाणी प्यालेला वरिष्ठ अधिकारी त्या व्यवस्थेशिवाय बोट बंदराबाहेर काढू देईल काय?

'मग लव्हेंडर मूर्ख की.......'

'तसेच काही नाही सर. पण सदा सर्वदा ब्रिजवर रेंगाळणाऱ्या त्या प्राण्याला कोठले एवढे समजावयाला व लक्षात यावयाला?"

'हं:! पात्रच आहे झालं. अच्छा एस. जी. आता आपण एका पेगमध्ये त्याला विसरू या हं.' असे म्हणून ब्रिगेडियर बॉसने 'व्हाईट हॉर्सचे' बूच उडविले.

## माणसेच काय पूलही उतरविले

जसजसे अधिकाधिक दिवस लोटू लागले तसतसे आम्ही सराईत बनत चाललो. एकदा तर सैनिकांसह एक सबंध झुलता पूलही मी वाहून नेला व बुलडोझर्सच्या साह्याने आणि शिप्स् कंपनीच्या सहकार्याने तो उभारून ही दिला.

## आणि विमानतळही

आणखी एका प्रसंगी अर्धवट सूचना मिळूनही अवघ्या चार तासात आमच्या उद्दिष्टाचे ठिकाणी लढाऊ विमानाना उतरण्यायोग्य धावपट्टी तयार करून दिवा आणि कंट्रोल टॉवर, विंड-बॅग फार काय राहुटयाहि ठोकून आम्ही परतलो. त्या कामी लेफ्टनंट एडमंड (एडिंबर्ग) व सब – लेफ्टनंट लिट्ल (ग्लासगो) या दोघा स्कॉट अधिकाऱ्यानी चांगलेच कौशल्य दाखविले. तसेच झैदी या माझ्या एकमेव हिंदी अधिकाऱ्यानेही सर्व काम अतिशय चोखपणे करून घेतले. गेला नंतर बिचारा पाकिस्तानात. त्या कामगिरीबद्दल सर्वांचाच यथोचित गौरवही झाला.

सुमारे दीड वर्षानंतर विश्रांतीसाठी आम्ही मायदेशी परतलो. त्या अठरा महिन्यात अठरा वर्षांचा अनुभव आमच्या खाती जमा होता.

आता तर भारत स्वतंत्र आहे. फ्लॅग-ऑफिसरची शानही मी भोगली. सेवानिवृत्त होऊनही काही वर्षे झाली. पण अजूनहि सहज कधी कोठेही आफ्रिका व आशियाचा संयुक्त नकाशा दिसला रे दिसला की "बाब–एल मंडेलब" डोळ्यासमोर उभे राहते...... ●●●



-वा. रा. सोनार

**ही पुढं चालली सेना**
**ही पुढं चालली सेना**
**लांबे अजागळी पाळणा !**

**एका** भल्या पहाटे अजागळवाडीत दवंडीनं जाग आली. जो तो चुळवुळत उठला, आणि कान देऊन प्रत्येकानं दवंडी ऐकली. कमावलेल्या आवाजात दहा पोरांचा वाप वारक्या पेंढारी दवंडी देत होता, "ऐका हो, ऐका ! सरकारच्या इच्छेपरमानं उद्या पहाटेला अजागळवाडीत एक शिवीर भरनार हाय. आपल्या देशात हिन्दुस्थानात आनि त्यातल्या त्यात अजागळवाडीत लई मानसं झाल्याची वोंव हाय्. जिकडं पहावं तिकडं मानसंच मानसं. आता मी हतं उभा हाय, तिथवी मानसांमुळं हुभं न्हायाला जागा न्हाई. असंच चालत न्हायलं तं आपल्या देशात म्हंजी हिन्दुस्थानात आन् अजागळवाडीत गर्दीच गर्दी हुईल. ह्यो घोटाळा हु ने म्हनून सरकारनं आपापल्या ... अं... अं... टुकुंबाच्या योजनेसाठी शिवीर काढल्यालं हाय. तवा समद्यास्नी म्हंजी पुरुप-वाये, वायका-पोरास्नी या संधीचा फायदा घेऊन सरकारला मदत करावी होऽ !"

आता शिवीर म्हणजे काय, ते कुठं, कोण भरविणार ? सरकार म्हणजे नक्की कोण याचा वारक्या पेंढाऱ्याला पत्ता नव्हता. तेव्हा भवती गोळा झालेल्या अजागळ वाडीतल्या नागरिकांचं कुतुहल शमविण्यासाठी त्यानं गावच्या सरपंचाकडे वोट केलं अन् तेथून दुसऱ्या आळीत पोवारा केला.

मारुतीच्या पारावर भली भली मंडळी जमली. यशवंता खोत, भटाचा नारायण, म्हादू कोळी आणि वावा मास्तर अशी प्रमुख मंडळी जमली. पोरे-सोरेहि जमली. उद्या काहीतरी आपल्या गावात नवीन घडणार याच आनंदात पोरे होती.

वावा मास्तर स्वातंत्र्य मिळून वीस वर्षे होत आली तरी अजून खादी वापरीत. कोणतीहि चळवळ म्हटली की वावा मास्तर पुढे. किंवहुना कित्यक लुंग्या-सुंग्या भांडणाना 'राष्ट्रीय पातळीवर' नेण्याचे श्रेय वावा मास्तरांचेच होते. त्यामुळे अजागळवाडीत वावा मास्तरांचे नैतिक वजन फार होते. त्यांच्यापर्यंत कुणी भानगड नेत नसत !

मीठाच्या सत्याग्रहापासून तो शस्त्रक्रिया शिवीरापर्यंत मास्तर सारख्याच उत्साहात अजागळवाडीत जागृति निर्माण करीत. एरवी सांस्कृतिक तासाचा कार्यक्रम सोडला तर वर्गात शिकविताना मास्तराना झोप येई असा काही व्रात्य पोरानी त्यांच्या नांवाचा वभ्रा वाडीत केला होता.

वावा मास्तर पुन्हा शीघ्र कवि होते. खादीचे एक युग होते, त्यावेळी मास्तरानी कविता केली होती.

'जन हो, खादी वापरा खादी.
लेंगे स्वराज्य आम्ही, असू नर वा मादी,
जन हो. धृ.।।

हे गाणं त्यावेळी अजागळवाडीत प्रत्येकाला पाठ होतं. यातलं 'नर मादी' हे पुष्कळ कवी मनाना खटकलं होतं. पण 'स्वातंत्र्यासाठी अशीच खडतर गीते लागतात,' असं एक वाक्य फेकून मास्तरानी आणखी एक कडवट कडवं पूर्ण केलं होतं ! दूर कशाला, दारूबंदी आल्याबरोबर मास्तर



झिंगल्यासारखे प्रचाराला निघाले होते.

'दारूने बघा कशी केली हो दैना,

दिसतंय् का— नाहीतर पहा हा ऐना'

आणि कित्येक दारूबाजाना 'ऐना' दाखवून प्रात्यक्षिकानं त्यांच्या दैनावस्थेचं प्रतिबिंब दाखवलं होतं. सरकारकडून त्याना दोन डझन आरसे बक्षिस देण्यात आल्याचीहि दारूबंदीखात्यात नोंद आहे म्हणतात.

पोरे पहाताच नाक मुरडून घेऊ लागले. 'मुले म्हणजे संकटचि भले!' म्हणून घरोघरी त्यानी नवी मोहीम सुरू केली.

मारुतीच्या पारावर जमलेल्या मंडळीत बाबा मास्तर आपापल्या परीने जोरदार भाषण करीत होते. पोरे सारखी टाळ्या पिटीत होती. गावकरीहि या नव्या मोहीमेबाबत माहिती गोळा करायचं कार्य आपापल्या मगदुराप्रमाणं करीत होती.

तच पाटील गावकऱ्याना 'बसा, बसा' सांगत होते. त्यांचा आवाज फार बसलेला होता.

सगळी सभा एकदाची तटस्थ झाली. तेव्हा कुणी प्रथम बोलायचं या विचारात मंडळी एकमेकांकडे उगीचच पहात राहिली. बाबा मास्तर पाटलांकडे, पाटील मिशी पिळीत गावकऱ्याकडे आणि गावकरी नवीन आलेल्या माणसांकडे पहाण्याचा कार्यक्रम पार पडला. शेवटी पाटलाना बाबा मास्तरानी खूण केली आणि त्याना बोलायला विनंति केली.

पाटील बोलायला उभे राहिले. त्यानी एका हातातली मिशी पिळायचं थांबवलं. ते थांबवल्यावरच पाटलाना कंठ फुटला,

"गांवकरी मंडळी, आज समद्ये जमलो. कां ?. . ." यावर पाटील चूप झाले. सभाभर डोळे फिरवू लागले. पाटलांनी सभेला प्रश्न विचारला असं समजून कुणी तरी ओरडला,

"चुकलं आमचं!" सभा फिसकन् हसली. पाटलाना किंचित् राग आला. मास्तर चरकले आणि त्यांची स्वयंसेवकासारखी धांदल सुरू झाली, पण पाटलानी प्रसंगावधान राखून सभा रेटली.

"चुकलं ना!.... तीच दुरुस्त करायला आपण समदे जमलो हाईत. आपल्या गावाला जोरदार हिष्ट्री हाय. आता हिष्ट्रीचं मी काय सांगत न्हाय्. ते तुमास्नी हिष्ट्रीचे मास्तर सांगतीलच. त्यांचाबी हिष्ट्री लई जोरदार हाय!"

आता यात पुन्हा खिदळण्यासारखं काय होतं? पण दोन बायकांचा धनी असलेल्या इतिहासाच्या मास्तरांचं साऱ्या गावाला कौतुक होतं. सभा थोडी शांत झाल्यावर पाटलानी भाषण सुरू केलं, "आता मी मुद्यावर येतो. आपल्या गावानं प्रत्येक बाबतीत आघाडी मारलेली हाय्. आन् तसं नसतं तर आज असा जमायचा परसंग पन आला नसता. तवा आघाडी ही मारल्याली हाईच! उद्यापास्नं हतं शिबीर हुनार हाय्. आता या शिबीरात तुमचं काय काम तर शस्त्रक्रिया!. . . तुमास्नी

# भाग्याची गोष्ट!

वरं, आता दारूबंदी सैल झाली ना, तरी तोच मास्तरांचा उत्साह कायम! एके दिवशी नवी कोरी बांडीस अंगात घालून मास्तर निघाले. वाटेतल्या शिंप्यानं मधेच हटकल्यावर मास्तर त्यालाच सुनवू लागले,

"सैल करा, — सैल करा" या अर्धवट चरणावर बिचारा टेलर शरण आला. तो डोळे गरा-गरा फिरवीत मास्तरांच्या नव्या बांडीसाकडे पाहू लागला. काकुळतीने न सहावून म्हणाला,

"कां मास्तर, लई तंग झालीय् का ?" यावर आपल्याच नशेत मास्तर पुढे म्हणाले,

"दारुबंदी सैल करा —

सैल करा — सैल करा."

यावर नागू टेलरचा जीव हलका झाला. सैल करायची ती बारावंदी नसून दारुबंदी, आणि आपण ती कधीच सैल केली असल्याचं टेलरनं मास्तराना निक्षून सांगितलं. मास्तराना ते खरं वाटेना तेव्हा नागू टेलरनं चक्क बाटलीच मशिनीच्या कप्प्यातून बाहेर काढली आणि बूच सैल केलं तेव्हा कुठं मास्तर पुढं हलले!

अशा जागरुक बाबा मास्तराना ही एक नवी चळवळ मिळाली होती.

'मुले म्हणजे देवाघरची फुले' असं एकेकाळी कंठशोष धरून सांगणारे मास्तर

"का हो मास्तर, आता तुमी जे हे पोरांचं म्हनताय् तेचा आन् आपरेशनचा संबंध काय ?" एक शंका.

"आता पाटील, त्याचं काय आहे," मास्तर गंभीर होऊन शंका निरसन करण्याचा प्रयत्न करू लागले.

"आपल्या अजागळवाडीत झालीयत् पोरं खूप. आणि . . . आणि, सरकारला आणायचाय् समाजवाद! तेव्हा सरकारनं ठरविलं की शिबीर काढा - कीं—"

"आल्लाच सम्माजवाद ऽऽ!" सभेच्या भोवती उभी असलेली कारटी सामुदायिक आवाजात.

पोरं. . . शिबीर. . . समाजवाद यातलं एक अक्षर तिथल्या बाप्याना कळेनासं झालं. इतक्यात गावचे सरपंच तिथं नेहमीप्रमाणे घाईघाईत आले. सरपंच कां कुणास ठाऊक नेहमी घाईत असायचे. यावेळी पाटलांबरोबर आणखी चार-पांच सुटाबुटातली मंडळी होती. अलिकडे पाटलांबरोबर असली माणसं नेहमी दिसायची. त्यामुळे पाटलांचा वाडीत दरारा आणखी वाढला. त्या माणसांचे चेहरे भलतेच गंभीर होते. त्यावरून या माणसांचा शिबीराशी 'डायरेक्' संबंध असावा असा तर्क गावकऱ्यानी काढला. हातात न येणाऱ्या बारीक मिशाना पीळ भरायचं कार्य करी-



अनुक्रमणिका

ठऊक हायेच की आपुन इंडिया म्हंजी अहेसा. आता 'अहेसा' म्हंजी 'शस्त्र नको.' तुवां थोडक्यात काय तं शस्त्र म्हंजी हिंसा आन् शस्त्रक्रिया म्हंजी अहेसा ! तुमच्या ध्यानात समदं आलंच आसंल !!"

या स्पष्टीकरणावर गावातली टारगट पोरं जोरजोरात टाळ्या वाजवू लागली. त्याना पाटलांची ही 'शस्त्रक्रिया' एकदम पसंत पडली. पाटील आपल्या नादात पुढं बोलतच होते.

"आता या शस्त्रक्रिया शिबीरात समद्यास्नी सहकार्य...अमोल सहकार्य... द्यावं ही विनंती. जास्तीत जास्त अशा क्रिया करून घेतल्या कीं आपल्या गावाला ढाल मिळंल. ती ढाल मिळवनं तुमच्या आमच्या हाती हाय्. काय वाटेल ते करून ही सरकारी ढाल आपन मिळवलीच पाह्यजे. त्यासाठी एकेकाला दोन-दोनदा जरी—"

यांवर त्या सुटाबुटातल्या माणसांपैकी कुणीतरी एकजण — 'पाटील, पाटील' असं ओरडला. त्याने पाटलांचा आवेश ओसरला. पाटील खाली बसले. बाबा मास्तरांना या प्रसंगी फार गहिवरून आलं. त्यांचं शीघ्र-कवित्व जागं झालं. भर सभेत त्यानी एक चुरगळलेला कागद काढून गायला सुरुवात केली.

"ढाल जिंकू या ढाल,
लोकहो, ढाल जिंकू या ढाल.
शिबीरामध्ये भाग घेऊनी
जीवनी आणू ताल ! ढाल ।।धृ।।
जरि जाहल्या आमुच्या चुका
पदरी घेतील डाक्टर काका
शिबीरामध्ये भाग घेऊनी
जीवनी आणू ताल ।।धृ ।।

असे समग्र गीत संपल्यावर बाबा मास्तरानी सरकारच्या वतीनं आणखी एक जाहीर सूचना केली :

"शिबीरांत भाग घेणाऱ्या प्रत्येक इसमास रु. १०१– मानधन देण्यात येईल."

साऱ्या अजागळवाडीत चैतन्य पसरले. प्रत्येकापुढे ढाल दिसू लागली, काय वाटेल ते होवो, ढाल मिळविलीच पाहिजे, या विचाराने सर्वांना भारावले.

गावात इतकी खळबळ माजली तरी गावाच्या कोपऱ्यात राहाणाऱ्या भागू महालेला या गोष्टीची गंधवार्ताही नव्हती. आणि ते बरोबरच होतं. एक तर भागू हा अगदी कोपऱ्यात राहात होता, अन् दुसरं म्हणजे त्याचं नुकतंच लग्न झालं होतं. गेले चार दिवस तो थंडीतापानं अंथरुणावर पडून होता. दुपारची थंडी वाजून यायची आणि रात्री ताप. एकूण भाग्याला ताप होता !

नाही म्हणायला भाग्याची नवी नवरी थोडी हुशार होती. शहरातली असावी. तिनं भाग्यापाठी पिरपिर सुरू केली,

"ऐकताय् का ?"

यावर भागा ढीम हलला नाही.

"अव, ऐकतांय् का ? मी म्हंती, गावात उद्यापास्न डाक्तर येनार हैती. तुमची ताशीर दाखवा त्येंना"

"आगे, कां उगाच पिडती ? थंडी हाय जाईल पळून !"

"पन् दुखनं कां लांबवा मी म्हंती. लवकर इलाज क्येला कां गुन न्हाई का येनार. आन् रोजगार बुडतो त्याचं काय ?"

"बरं बाई, आता उद्या येऊ दे मी जाईन तिकडं. उगाच पिरपिर नको."

यावर ती बिचारी गप्प बसली. भाग्या महाले या कुशीवरून त्या कुशीवर वळला, आणि दुसरे दिवशीची वाट पहात बसला.

दुसरे दिवशी शाळा लवकर सोडण्यात आली. शाळा लवकर सुटल्यामुळे मुलाना खूप आनंद झाला. पोरे घरोघर पळाली, शाळेच्या मुख्य दरवाजावर भलामोठा फलक लावण्यात आला, 'शस्त्रक्रिया शिबीर.' मध्ये ढालीचं चित्र होतं. शाळेच्या आवारात तोरणे, पताका लावण्यात आल्या. जिथे मुख्य फलक होता, तेथे दोन्हीं बाजूस केळीचे खुंट लावण्यात आले. वर्गाच्या वेगवेगळ्या खोल्यांचं पहाता पहाता शिबीरात रूपांतर करण्यात आले. एका खोलीत सर्वात आधी डॉक्टर इ. मंडळींची चहा-पानाची सोय करण्यात आली; कारण त्याशिवाय शस्त्रक्रिया होतच नाही, असं अनेक डॉक्टरानी पाटलाना सांगितले. दुसऱ्या खोलीत शस्त्रक्रियेची टेबले, हत्यारे, वेगवेगळी औषधे, डोळे उघडे ठेवून बाकी भाग झाकून टाकणारी पांढरी वस्त्रे इ. सामान उतरविण्यात आले. पलिकडच्या खोलीत परिचारिकांचा ताफा उतरणार होता, म्हणून केलेली सोय. या खोलीत, पाटलानी सगळी व्यवस्था झाल्यावरहि उगाच तीनचारदा जातीनं जाऊन चौकशी केल्यावर प्रकरण मुख्य डॉक्टर-महाशया-पर्यंत गेलं !

दुसरे दिवशीची सकाळ. सनई-चौघड्यांनीच मुळी गावाला जाग आणली. गावकरी मंडळी भीत भीत गोळा झाली. तरणी-ताठी मंडळी शिबीरापासून चार हातांवर गंमत पाहू लागली. पाटील त्यांचे-कडे मिशावर पीळ भरीत पाहू लागत. परिणाम असा होई कीं एकदोन प्राणी जड पावलानी शाळेकडे चालत येत. बाबा मास्तरांच्या अफाट उत्साहामुळे दीपून गेलेली त्यांच्या वर्गातली पोरेहि 'शिबीरात प्रवेश मिळावा' म्हणून हट्ट धरून बसली. तेव्हा हे बौद्धिक शिबीर नसून 'शारीरिक शिबीर' असल्याचा खुलासा मास्तरानी केला, पण त्यामुळेहि पोरांचं समाधान झालं नाही. तेव्हा त्याना तसेच सोडून देत मास्तर गर्दीत शिरले. त्यांच्या अंगात आज अमाप उत्साह संचारला. कित्येक नागरिकाना मास्तर हात धरून ओढून आणीत. ज्याला मास्तरानी धरलेलं असे, तो धोतर सावरत ओशाळा होऊन मास्तरांच्या मागून ढकलला जाई.

शेवटी शिबीरेच्छुंची एक मोठी रांग करण्यात आली. प्रत्येकाला लग्नात देतात तसे बिनवासाचे फुलांचे वटण देण्यात आले. गुलाल लावण्यात आला. आणि साऱ्या गांवातून त्यांची एक भली मोठी मिरवणूक काढण्यात आली. ठिकठिकाणी शिबीरेच्छुंना ज्यांच्या त्यांच्या, सुवासिनींनी ज्यांना त्यांना ओवाळले. या प्रकाराने युद्धभूमीवर निघाल्यासारखे चेहरे करीत शिबीरेच्छू मिरवणुकीत मिरवू लागले. यात कांही गैरप्रकारहि झाले. एका सुवासिनीने आपल्या नवऱ्याला ओवाळण्याच्या निमित्ताने घरात घेऊन पुन्हा सोडलेच नाही. यावर सारी मिरवणूक तिथंच अडली. बावा मास्तरानी, 'ढाल जिंकू या ढाल !' समूह-गान सामुदायिकरित्या म्हटलं. पण त्या बंद दारावर काहीच परिणाम झाला नाही. तेव्हा खिडकीच्या गजातून ढालीचं चित्रहि दाखविण्याचा शेवटचा निकराचा प्रयत्न झाल्यावर बावा मास्तरानी चिडून "ढाल-गज कुठची !" एवढंच बोलून ढाल आणि गज यांचा नाद सोडून दिला ! पण असे प्रकार क्वचित् ! मिरवणूक पुढे पुढे निघाली. बावा मास्तरानी संचालन गीत तेव्हाच 'पाडलं.'

हो पुढं चालली सेना—
ही पुढं चालली सेना—
लांवे अजागळी पाळणा —

हे त्या गीताचं धृपद अजागळवाडी एका सुरात म्हणू लागली.

मिरवणूक शाळेच्या तोंडाशी येताच सर्वांना चहापान देण्यात आले. सर्वांना बसविण्यात आले. इष्ट त्या सूचना देण्यात आल्या. प्रत्येकाला रु. १०/— मानधन घेण्याबाबत पुनः पुन्हा सांगण्यात आले.

शिबीराचा नारळ फोडण्यात आला. बावा मास्तरानी नारळ फोडला; आणि शिबीराचे उद्घाटन झाल्याचे पाटलानी जाहीर केले. पाटलाना याच वेळी काही तालुक्याला काम निघाल्याने त्यांची जायची धावपळ सुरू झाली. त्याना काय एवढेच कांम होते ? त्याना आणखी काही आघाडया सांभाळायच्या होत्या. त्यामुळे त्यांचे जाणे योग्यच होते. पाटील निघून गेल्यावर आपणहि जावे असा विचार एकदोन मंडळींच्या मनाला स्पर्श करून गेला. पण रांगेतून आता उठून जाणे शक्य नव्हते. शिबीराचा बंदोबस्त चोख होता.

डॉक्टर—महाशयांचा उत्साह काय वर्णावा ? एका अति शीघ्र कवित्व लाभलेल्या डॉक्टराने एका फलकावर आपली भूमिका स्पष्ट करणारे सुवचन लिहून काढले.

'अवघाचि संसार । सुखाचा करीन
शिबीरे भरवीन । गावोगाव ॥

तीन चार डॉक्टरानी पहाता पहाता आपल्या कार्याला धडाक्यानं सुरुवात केली. "इतक्या मोठ्या प्रमाणात केलेल्या गोष्टीला खरे म्हणजे 'यज्ञ' ही संज्ञा वापरण्यात येते. 'नेत्रयज्ञ' 'दंतयज्ञ' तेव्हा या शिबीरासाठी कोणता यज्ञ म्हणावे ?" एका डॉक्टराचा प्रश्न.

त्यावर कोणासच या प्रश्नाचे उत्तर न सुचल्याने शस्त्रक्रियांची गति तेवढी वाढली !

दुपारपर्यंत अर्धी-अधिक रांग उरकविण्यात आली होती. आला माणूस कीं घे टेबलावर, कर शस्त्रक्रिया कीं ने पलीकडे ! असा खाक्या. अधे-मधे उगाच फिरकणाऱ्या बावा मास्तरानाहि एका डॉक्टरानी न ओळखून टेबलावर घेण्याचा खटाटोप केला होता. पण परिणामी त्यांच्या आरडघा-ओरड्याने मोठ्या प्रयासाने त्यांची सुटका झाली. हो ! त्याना काय हेच गाव होते उरलेले ! अशी कितीतरी गावे त्याना पार करायची होती. सगळ्या देशाचा उद्धार करायचा म्हणजे काय सोपी गोष्ट होती ? ती डॉक्टर झाल्याशिवाय कशी कळणार ? झाले !

शिबीरात एके ठिकाणी फलक ठेवण्यात आला. क्रिकेटचा स्कोअर लिहावा, तसा झालेल्या शस्त्रक्रियांचा आकडा त्यावर लिहीला जाई. आकडा फुगत चालला, तशी ढाल आपल्याच गावाला मिळेल अशी सगळ्यांची खात्री होऊन चुकली !

आणि भाग्या महाले बायकोच्या सतत टुमण्यानं बेजार होऊन, कंटाळून शिबीराकडे फिरत फिरत आला. इकडे डॉक्टर-मंडळी आली आहेत, एवढंच त्याला ठाऊक होतं. शिबीर म्हणजे काय, हे त्याच्या गावीहि नव्हतं. त्याची त्याला जरुरीहि नव्हती !

भाग्याच्या अंगात ताप फणफणत होता. थंडीनं थाड् थाड् उडत होता. भाग्या जीवाचं बळ एकवटून कसातरी शाळेपर्यंत आला होता. 'हुः हुः !' करीत होता. तो आला आणि शिबीरार्थींच्या रांगेत जाऊन बसला. शेजारच्या माणसानं भाग्याला निरखून पहाण्याचा प्रयत्न केला पण भाग्या थंडीनं बेजार झाला असल्यानं तोंडावरून पांघरूण घेतलं होतं. विचारल्या प्रश्नाला उत्तर द्यायच्या मनःस्थितीत भाग्या नव्हता. नाहीतरी ही मंडळी विचारून विचारून काय विचारणार ? जे दुखणं आहे ते डॉक्टरला सांगण्यात काही अर्थ ! भाग्यानं मनाशी विचार केला आणि मूग गिळून बसून राहीला.

इकडे शस्त्रक्रियाना ऊत आला होता. सगळ्या डॉक्टर-परिचारिकाना कसं कृतकृत्य वाटत होतं. त्यांच्या चेहऱ्यावर कर्तव्याचा आनंद झळकत होता. मधून मधून चहा घेतल्यानं त्याना हुशारी वाटत होती. हुशारी वाटू लागली की त्याना शस्त्रक्रिया करावीशीच वाटे ! आणि मग ते पुन्हा मश्गुल होऊन शस्त्रक्रियेत दंग होऊन जात !

भाग्या महालेची पाळी आली, तशी त्याला एका खोलीत नेण्यात आलं. तिथल्या कारकुनानं, दिवसभर ओरडून गेल्याकारणानं हळुवार आवाजात त्याचं नांव विचारलं. भाग्याला थंडीनं बेजार केलं होतं. तेव्हा आणखी पांघरूण घेत त्यानं आपादमस्तक न दिसायची व्यवस्था केली, आणि कारकुनाच्या प्रश्नाला 'हुंः हुं :!' ने उत्तर दिले.

"अहो, नांव सांगा नांव !"

भाग्या चूप ! एक नाही कीं दोन नाही. "बहिरा दिसतो" हे कारकुनाच्या तोंडचे शब्द ऐकल्यावरहि भाग्या एक नाही की दोन ! शेवटी कारकून कंटाळले.

कारकुनाने त्याचा कागद तसाच कोरा ठेवून त्याच्या हातात दहाची दोट कोंवली. दहाची नोट आपल्या हातात, आणि तेहि एका कारकुनानं कोंवण्याचा प्रकार भाग्याला अगदीच नवीन होता. किंवहुना काहीतरी उलटं होत असल्याचं त्याला उगीच वाटू लागले: पण हा आपल्या मौनाचाच प्रभाव असल्याचं त्याला वाटलं; आणि तोंडातून शब्द काढला तर कदाचित् कारकून आपली चूक सुधारील म्हणून भाग्या महालेनं जवळ जवळ पळच काढला, पुन्हा दुसऱ्या खोलीत तो धाडकन् शिरला. त्याचा ताप थोडा हटला. थंडी पळाली !

भाग्याला हे नवीन होतं. सरकारनं खेडोपाडी डॉक्टर धाडले, दवाखाने काढले, पण सरकारने इतकं चांगलं व्हावं, हे त्याला पटेचना. भाग्याची पाळी आली तशी एका परिचारिकेनं भाग्याच्या पांघरुणाला धरले, त्याला पुन्हा थंडी भरली ! त्याला शब्द फुटेना. सरकार फारच चांगलं आहे, अशी त्याची खात्रीच पटली !

जेव्हा त्याला एका टेवलाकडे नेण्यात आलं, तेव्हा भाग्याला आपली तक्रार सांगायची वेळ जवळ आल्याचं भासलं. बोलवोलता त्याला झोपविण्यात आलं. दंडाला करकचून आवळून घेणाऱ्या पट्ट्याने त्याला कळ लागली, आणि त्याचा रक्तदाव नोंदण्यात आला. दहाची मूठ घट्ट आवाळून घेत भाग्या डॉक्टरकडे टकामका पहात राहीला. वस्तुत: इतक्या वेगात आलेल्या शिबीर-कार्यात खरे तर ही एक खीळच होती. असा वेळकाढूपणा कुणीहि केला नव्हता, पण भाग्या नवखा होता. असतो एकादा पेशंट ! आपल्याला थंडी येतीऽ् हे भाग्याला सांगायचं होतं. पण त्याच्या आतच त्याला दरदरून घाम सुटला. डॉक्टर महाशयानी त्याच्याकडे रोखून पाहीलं, तशी त्याची थंडी पळाली, तो त्. . .त्. . .प्. . .प् करू लागला. असल्या नवखेपणाला वुजणारे डॉक्टर नव्हते ते ! त्याच्या दोन सेवकानी भाग्याचे दोन हात आवळून धरले. आणि परिचारिकानी पाय ! यावर भाग्याने, उरलेलं शरीर हिंसळायला सुरुवात केली. तेव्हा डॉक्टरांनी दम भरला,

"चूप ! गडवड करायची नाही !"

"अ...हो, डॉ...क्..त्...र ऽ !"

"चू ऽ ऽ प !"

"म्...म्....मला....थं्....थं...."

"तुला काही होत नाही."

"मला ताऽप ऽऽ"

"चूप. मॉर्फिया द्यारे. इतकी ऑपरेशन्स केलीत. एकाला ताप नाही, म्हणे ताप."

"डाक्तर. . . थंडी. . . !"

"चूपऽ ! लाडात् नकोस. थंडी म्हण. ढोंगी. काही होत नाही समजलं !

या वरोवरच मचून मचून वोलणारं भाग्याचं तोंडहि एका परिचारिकेकरवी वंद करण्यात आलं. भाग्याची दहाची मूठ सैल केली, तरी उपयोग झाला नाही.

आणि अवघ्या दहाच मिनिटात डॉक्टर पुटपुटले, "यशस्वी. व्हेरी गुड्!" आणि भाग्याला पलीकडच्या वॉर्डात पाठविण्यासाठी आदेश देण्यात आला आणि त्याचे कार्ड मागव्यात आले!

सुटलेल्या कासोटयातले कोरे कार्ड भाग्याने हवेत उडविले. आणि तो चवताळून उठला. त्याला वेदना होत होत्या, हे निश्चित्. काय झाले, याची कल्पना नाही म्हटले तरी भाग्याला येऊन चुकली होती. त्याचा ताप थंडी पार पळाली.

कोऱ्या कार्डाकडे पहात डॉक्टराना घाम फुटला. त्याचे नांव—गाव कसलाच खुलासा त्यावर नव्हता. म्हणजे? हे झाले कसे? हा मुळी आत आलाच कसा? हा शिबिरार्थी होता ना?... असे अनेक काजवे मुख्य डॉक्टरमहाशयांच्या डोळयांपुढे चमकले.

भाग्या उठून बसत डॉक्टरला काकुळतीनं म्हणाला, "डॉक्टर, अवो, हे काय केलंसा! म्हाजं लगीन सा महिन्याखाली झालं!"

यावर पटकन् मुद्दा न कळल्याने डॉक्टर खवळले, "म्हणून काय झालं!...अं? या प्रतिप्रश्नाने परिचारिका फिसफिसल्या. झालेला भयंकर घोटाळा डॉक्टरांच्या लक्षात आला. करू नये त्यावर शस्त्रक्रिया होऊन चुकली होती. डॉक्टराना घाम फुटला. त्याना ताप भरल्यासारखे वाटू लागले. थंडी वाजू लागली. दातखीळ बसली. हे काय झाले! भयंकर झाले!!

शिबीराचा उरला कार्यक्रम ताबडतोब स्थगित करण्यात आला. उरलेल्या शिबीरार्थींना मुक्त करण्यात आले. ते आनंदानं घराकडे धावत सुटले, आणि सगळी डॉक्टर मंडळी भाग्याच्या भवती खाली मान घालून उभी राहिली.

"भाग्या आम्हाला क्षमा कर, पण हे प्रकरण इयंच मिटव!"

"अवो, तुमी मलाच कायमचा मिटवलाय्, मी काय प्रकरनं करनार?" "धीर धर भाग्या" एक निरर्थक वाक्य.

हां हां म्हणता ही बातमी शिबीरापासून गावात पोचली. अजागळवाडी पुन्हा जागी झाली. बाबा मास्तर घाबरले. सरपंच केव्हाच तालुक्याच्या गांवी निघून गेले होते. दाद न्यायची कुणाकडे?

भाग्या महालेच्या भाग्याचं आभाळच कोसळून पडलं होतं. त्याच्यावर भलं संकट आलं होतं. तेहि एका यःकश्चित् चुकीमुळे.

अजागळवाडीत वावडीसारखी ही बातमी पसरताच पाटलाच्या वैरावर असलेल्या मंडळींनी दावा सावला. त्याना ही संधि भाग्याने आली होती! पाटलावर तोंडसुख घ्यायचा हा प्रसंग वाया घालवायचा मूर्खपणा ती मंडळी कसा करणार? विरोधी पार्टीचा सखाराम यानं सारा गाव गोळा केला. म्हातारी कोतारी, मुले अनिच्छेने झालेले शिबीरार्थी, बायका-मुली साऱ्यांची एकच झिमड उडाली. गर्दीला बघता बघता मिरवणुकीचं रूप आलं. भाग्याची दुर्दैवी ठरलेली दुर्भागी बायको मिरवणुकीच्या अग्रभागी उभी करण्याची चतुराई सख्याचीच. हाताशी चारदोन पोरे घेऊन त्याने भराभर घोषणा फलक तयार केले; आणि मिरवणुकीत पेरण्याची व्यवस्था झाली. बाबा मास्तर झटकन् सख्याला येऊन मिळाले. वेळ तशीच होती. कारण सरपंचाबरोबर काही ओलेहि जळणार होते, त्यात बाबा मास्तरांचंहि नाव प्रामुख्यानं घेतलं जात होतं. तेव्हा बाबा मास्तरनं वेळीच शहाणपण दाखवून भाग्याच्या बायकोचं कौतुक, तेहि काव्यात करायला सुरुवात केली:

भंगले भाग्य भाग्याचे
अता कोण तयाचा वाली
या शिबीराने कसे पहा
रामायण घडले अजागळी.

बाबा मास्तरानी गळा काढला म्हणून भाग्याच्या बायकोनं हुंदके द्यायला सुरुवात केली. तिच्या पाठराखणीला आलेल्या बायकाना तिचं दुःख पहावेना, म्हणून त्या डोळयाला पदर लावून आक्रोश करू लागल्या. ते पाहून कडेवरची पोरेबाळे गळा काढू लागली. अजागळवाडीत एवढी शोकयात्रा पूर्वी निघाली नव्हती.

मिरवणूक शिबीर-स्थानी पोहोचली तेव्हा तिथं काही शिबीरार्थी आणि भाग्या विव्हळत होते. सखारामानं जोरजोरात घोषणा द्यायला सुरुवात केली.

'ये जालीम सरकार नही रखना' सगळयानी तोच सूर धरला.

"शिबीरार्थींना—" यांवर पूर्ण कसे करायच्या घोटाळयामुळे दोन वेगळाले आवाज वातावरणात उठले.

"हाणून पाडा" काही आवाज.

"सवलती द्या" दुसरे आवाज.

शेवटी सखारामानं दोन-तीन घोषणांची संथा जनतेला दिली. आणि पुन्हा सारे वातावरण घोषणानी दुमदुमून गेलं.

"भाग्या महालेला—"

"न्याय द्या"

"भाग्या महालेची शस्त्रक्रिया—परत घ्या" एक अनाहूत घोषणा.

सखारामाचा सगळा राग सरपंचावर होता. आणि ही संधि फारच नामी होती. त्याने भाषण करायला सुरुवात केली. भाग्याचं ऑपरेशन करून सरकार समाजवादापासून कसे दूर चालले आहे हे तो जनतेला पटवून देऊ लागला.

**आंधळ्याला....**




भीक नको, मते द्या!

एकाएकी भाग्या प्रसिद्धीच्या शिखरावर सरसर चढून गेला. जो तो भाग्याला पहायला उत्सुक होता. भाग्याचं दर्शन ही भाग्याची गोष्ट मानली जात होती. शेवटी लोक-आग्रहास्तव एका उंच आसनावर भाग्याची बसायची व्यवस्था करण्यात आली. त्याच्या गळयात विरोधी पक्षांतर्फे हार टाकण्यात आले. उपोषण सोडणाऱ्या पुढाऱ्यासारखा चेहरा करून भाग्या शांतपणे बसून होता. इतका गाव घाळवला जाईल अशी त्याला स्वप्नातहि कल्पना नव्हती. त्याहि परिस्थितीत आपल्या बायकोकडे त्याने हतबल दृष्टीनं एक कटाक्ष टाकला.

अजागळवाडीच्या पंचक्रोशीत ही बातमी वाऱ्यावर पसरली. बघता बघता झुंडीच्या झुडी वाडीच्या दिशेने घुसू लागल्या. लोकांची रीघ लागली. गर्दी अनावर होतीय् हे पाहून बाबा मास्तरानी पुरुष आणि स्त्री अशी गर्दीची विभागणी केली, आणि गर्दीला इष्ट ते वळण लावलं ! तिकीटासाठी रांगा लावतो तशा रांगा तयार करण्यात आल्या. कुणीतरी 'तिकीटे लावा' असेहि सुचविले. पण तिकीट लावून भाग्यात पहाण्यासारखे काय आहे, असा सूज्ञ विचार करून 'भाग्या-दर्शना'ची संधि तमाम जनतेला मोफत उपलब्ध करून देण्यात आली.

परिस्थितीचे गांभीर्य ओळखून बाबा मास्तर भाग्या शेजारीच राजावर चवरी ढाळणारे उभे राहतात, तसे उभे राहिले; तसलाच आंबट चेहरा करून येणाऱ्या बंधु-भगिनींना परिस्थिती-म्हणजे भाग्याची —समजावून सांगत होते. पुढे पुढे त्यांचा आवाज बसला आणि अस्फुट शब्दांनीच ते वर्णन करीत राहीले.

"भाग्या.....थंडी...ताप....डॉक्टर....चूक ....नशीब...सरकार ......समाजवाद झिंदाबाद !"

अशा तुटक शब्दांतून वेगवेगळ्या दहाबारा कथा तयार होऊन भाग्याच्या दुःखाभवती चिकटल्या आणि मूळ दुःखापासून दूर पळाल्या ! त्यामुळे पुढे पुढे भाग्याला सहानुभूति दाखविण्याऐवजी त्याच्यावर अभिनंदनाचा वर्षावच सुरू झाला, आणि बाबा मास्तरांची वाचा एव्हाना पार बसली !

या सगळ्या प्रकाराने घाबरून गेलेली डॉक्टर मंडळी तालुक्याच्या गांवी पळाली. पाटलांचा शोध करून त्यांच्या मध्यस्थीनं हे प्रकरण मिटवणं अवश्य होतं. नाहीतर नोकरीचा प्रश्न होता. त्यांच्या इभ्रतीचा प्रश्न होता. कारण बिचाऱ्या त्यांच्याजवळ जगण्यासारखे तेवढेच होते. त्यांच्या तोंडचे पाणी पळाले होते !

खूप यातायात केल्यावर पाटलांचा शोध लागला. ते ऐकून घेण्याच्या स्थितीत नव्हते. कुणीतरी एकाने त्याना चक्क हुंगून पाहिले आणि खात्री झाल्यावर कपाळावर हात मारला. त्याहि स्थितीत जमेल तसे पाटलांच्या कानावर झाली गोष्ट वाजविण्यात आली. त्यावर लुळ्या जिभेनं पाटील म्हणाले, "काळजी नको,



मी "करतो तुमाला ऑपरेशन..."

यावर ऑपरेशनचा धसका घेतलेल्या डॉक्टरना दरदरून घाम फुटला. पण लवकरच कुणीतर एकानं 'पाटलाना को-ऑपरेशन म्हणायचंय्' असं स्पष्ट करताच सर्वांना हायसं वाटू लागलं.

दुसरे दिवशीची गोष्ट. पाटील अजागळवाडीत शिरताच ते संतापाने लाल झाले. शिबीराची मूळ कल्पना त्यांचीच होती, आणि तीच आता त्यांच्या समक्ष चक्क कोलमडून पडली होती. त्यामुळे पाटील उधाणले होते. त्यांची ढाल थोडक्यात हुकली होती. आणि ती केवळ कुणा एका भाग्यामुळे! पाटलाचं स्वप्न मातीला मिळालं होतं.

ते तरातरा निघाले. एकटेच. हातात काठी घेतली, दोन आळी टाकून त्यांनी एका घरासमोर कमरेवर हात रोवीत रुवाबात दरडावलं, "भाग्या, आधी भाईर ये!"

त्या घरातून 'भाग्या' घाबरा धडपडत बाहेर आला. संतापलेल्या पाटलानां त्यानं उभं पाहीलं.

"भाग्या लई माजलास काय? माझ्या वाईटावर आलास?"

—पाटलानी तोफ डागली.

"न्हाई धनी, काय झालं असं?"

"काय झालं? काय झालं न्हाई ते इचार. समद्या गावाला गोळा करून माजी आबरू चव्हाटयावर खाटकाच्या बोकडावानी टांगलीस?. . .काय?"

"माझी काय चूक न्हाई पाटील!"

"चूक न्हाई म्हने! लाज न्हाई वाटत. झाली आसंल चूक डाक्तरांची, म्हनून काय, गप्प न्हाई न्हायचं?"

आता यावर त्यानं एकच सूर धरला, "माजी काई चूक न्हाई!"

आणि पाटलानी दुसरी आघाडी उघडली. तोंडानं राळ उडवीत ते हातहि चालवू लागले. त्याची पाठ सडकून काढायला सुरुवात केली. लाथा घातल्या. पेकाटात हाणलं. तो कोलमडून फेकांडत अंगणात पसरला. त्याची घरधनीण बाहेर आली. बिचारीला पाटलाचा राग कळेना, ती हातापायां पडू लागली. बघतां बघता गाव गोळा झाला. बाबा मास्तर भीतभीतच आले. पाटील आता मारून थकले होते. त्यानाहि बळ उरलं नव्हतं. पण ढाल गेल्याचं आणि बेअब्रू झाल्याचं दुःख त्याना चैन पडू देईना.

"पाटील याला कां मारताहात?" शेवटी गर्दीतल्या बाबा मास्तरानी पाटील पूर्ण थकले आहेत असं पाहून हळूच विचारलं.

पाटलांचं तोंड सुरूच होतं,

"आरं, झाला असल घोटाळा. म्हणून काय, यानं आमच्या वैरावर उठावं! आमच्या शत्रूला मिळून सरकारला हानून पाडायचं? गांवची ढाल घालवायची?..."

आणि बाबा मास्तरांच्या तल्लख मेंदूत प्रकाश पडला; आणि पाटलांची काठी वरचेवर झेलीत मास्तर म्हणाले,

"थांबा पाटील. घोटाळा होतोय् तो तुमचा. हा कुंभाराचा भाग्या आहे. तुम्ही म्हणता तो भाग्या महाले!"

"म्हंजी?" पाटील त्याहि स्थितीत जरा नरमले. "पाटील, हा कुंभाराचा भाग्या, याचं ऑपरेशन गुदस्ताच झालंय् तालुक्याला!"

आता पाटील चाट झाले. पण एकदम पडतं त्यांनी कां घ्यावं. थोडं थांबून त्यानी भाग्या कुंभाराच्या पेकाटात पुन्हा दोन लाथा घातल्या. आणि वर जोरात सगळ्या गावाला ऐकू जाईल असल्या उंच आवाजात खेकसले,

"आरं म्हून काय झालं? एकदा झालं म्हून काय झालं? दुसऱ्यांदा आपरेशन होत न्हाई कां?. . .करायचं होतं दुसऱ्यांदा ढालीसाठी!....गाढव कुठचा!"

—आणि आश्चर्यचकित झालेल्य गर्दीतून वाट काढीत पाटील, भाग्या महालेच्या घराकडे वळले.

आणि भाग्या महाले?—

आयुष्यभर ऊन खाण्याच्या तयारीनं केविलवाण्या दृष्टीनं आभाळाकडे पहात होता, वेड्यासारखा!•

## कामाचे डोंगर पोखरून उदीर काढणारा आणि त्या उंदराच्या सोह्याने जग जिंकणारा कलावंत—

# वॉल्ट डिस्नी

-दा. गो. देशपांडे



### सतत वाढीचे एक जीवन स्वर्गाला हेवा वाटला

**हृदयी** वाळगलेली स्वप्ने साकारणारे एक ध्येयासक्त व्यक्तिमत्व संपुष्टात आले. या भूलोकावर मुलांचा स्वर्ग मूर्तिमंत अलंकृत करणारे एकच शिल्पकार हरपले. कल्पनेच्या चिमटीत असलेले पण शब्द, नाद आणि आकार यांच्या आवाक्यात सहसा न मावणारे व सापडणारे असे जीवनाचे नाजूक, कोमल व तरल सूत्र शब्द, नाद आणि आकार यांच्या माध्यमात कलामयतेनं प्रतिमानून चिर सुंदर बनविणारी प्रतिभा आता पुन्हा चमकणार नाही. या जगात कुणाला जात आणि लेबल नसेल तर ती अश्राप बालकाना. प्रत्येकाला संसारात यथार्थतेनं गुंतवून ठेवणारी शक्ति असेल तर ती वात्सल्याची होय. धकाधकीच्या व दगदगीच्या आयुष्यक्रमात जर कोणत्या गोष्टीने प्रपंचात रस वाटत असेल तर तो निरागस चिमुकल्या रत्नानी. म्हणूनच 'गृहरत्नानि बालकः' असे म्हटले आहे. मात्र ही रत्ने संवर्धावयाची व अबाधित ठेवायची सिद्धि कुणाला पूर्णपणे जमली आहे ? प्रथम देवाघरचे देणे म्हणायचे आणि त्याचे संस्कृतीचे लेणे होणे दैवाधीन मानत मोकळे व्हायचे असाच क्रम दिसतो. उद्याच्या जगातील या खऱ्या रहिवाश्यासाठी आजन्म तडफडलेला आणि धडपडलेला आणि तडफडत-धडपडत चिकाटीने, निष्ठेने आणि अतुल धैर्याने एका नवलनगरीचा संकल्प सिद्धीस नेणारा रसिक प्रज्ञावंत काळाने हिरावून नेला. किंबहुना स्वर्गाला लाजवील आणि किंवा तेथेहि नसेल अशी एक दुनिया या माणसाने निर्माण केलेली त्यानी (स्वर्गस्थानी) पाहिली अन् त्याचा अनुकर जमला नाही तेव्हा त्यानी त्याला या भूलोकावरून उचलून नेले. नाव वॉल्ट डिस्नी !

### डोंगर पोखरून सोन्याचा उंदीर काढला !

—मात्र डिस्नींच्या डोळ्यापुडे, मुल्कराज आनंदच्या भाषेत बोलावयाचे झाल्यास, नवापासून ते नव्वद वर्षापर्यंतचे बालक होते: जे वस्तुतः बालक आहेत आणि ज्यानी शैशवास जपले आहे ते. मुलांच्या करता निर्माण केलेले असे वाटणारे चित्रपट—बोलपट आबालवृद्धानी सारख्याच आस्थेने व उत्साहाने ज्याचे पाहिले तो डिस्नी हा पहिला आणि शेवटचाच कलावंत झाला असे म्हटल्यास ते अतिशयोक्तीचे होणार नाही. **'मिकी माऊस'** हा त्याचा रजतसृष्टीवरचा अभूतपूर्व शोध होता. उंदरावर चित्रपट काढणाऱ्या माणसाच्या कल्पनाशक्तीस काय म्हणावे अशीहि त्याची त्या वेळेस हेटाळणी झाली. चित्रपट वितरकानी तर 'हा कसला प्राणी?' 'तो काय प्रेक्षणीय ?' असे आक्षेप घेतले. परन्तु मनाचा मानवी वेध घेणाऱ्या डिस्नीला आत्मविश्वास होता. 'लोकाना माझा उंदीर आवडेल' असे तो पुनः पुन्हा म्हणत राहिला आणि जेव्हा हा डिस्नीचा

उंदीर लोकांनी पाहिला तेव्हा त्यानी त्याला डोक्यावर घेतले. जगात अनेक ठिकाणी आणि अनेक भाषेत हा बोलपट दाखवण्यात आला. ज्यानी पाहिला त्यानी दाद दिली. टुण टुण उडया मारणारा आणि अनेक करामति करणारा मिकी पाहत असताना प्रेक्षक खद-खदत असतात. मुले तर हसून 'लोटपोट' होतात. या मिकीची जगा-वर चांगलीच छाप पडली. जवळ जवळ पावशतकाच्या वर मिकी व्यंगचित्रांचा अनभिषिक्त सम्राट राहीला. मिकीचे चातुर्य आपु-लकी निर्माण करणारे ठरले. शेतकऱ्यापासून ते जादूगारापर्यंत अनेक भूमिकांत मिकी खेळला, खुलला आणि रंगला. त्याने (मिकीने) ग्रह व धूमकेतू यांचे मार्गदर्शन केले. स्थल, काल आणि वेळ याच्या अतीत जाण्याची किमया त्याच्या ठायी जी दृग्गोचर झाली ती नेत्रदीपक व रंजक ठरली. या दृष्टीने रजतसृष्टीवरच्या डिस्नीच्या मूषकाच्या लिला म्हणजे आंतरराष्ट्रीय महत्त्वाच्या ठरल्या. उगीच नाही कीं, १९५० साली अमेरिकेतील येल विद्यापीठाने डिस्नीचा सन्मान करणारी पदवी दिली त्यावेळेस डिस्नीच्या मिकी माऊसच्या संदर्भात 'कामाचे डोंगर पोखरून त्यातून उंदीर काढणारा आणि त्या उंद-राच्या सहाय्याने जग जिंकणारा हा कलावन्त आहे–' असे उद्‌गार काढले.

## अचेतन आयुष्यमान झाले...

—करमणुकीच्या दुनियेतल्या या विक्रमाचे यथार्थ वर्णन 'या सम हा'च्या परिभाषेखेरीज अशक्य असले तरी त्याचे सूत्र धुंडाळणे उद्‌बोधक ठरेल. केवळ मिकी माऊसच नव्हे तर त्याचा नंतर अव-तरलेला **'डॉनल्ड डक'** साऱ्याना चटका लावून गेला. मानवेतर प्राण्यांची डिस्नीची रजतसृष्टीवरील प्रतिसृष्टी नजर खिळवून ठेवणारी आणि चित्तस्पर्शी असण्याचे कारण काय असावे ? डिस्नी आपल्या सहकार्यांच्या सहाय्याने आपला चित्रपट कणाकणाने आकारत असत. वारकावे अतिशय सूक्ष्म जाणीवेनं टिपत व त्यांची मांडणी, निसर्गपूत जीवनात मुळीच अफरातफर न होऊ देता, करत. त्याच प्रमाणे अकृत्रिम जीवनाचा अनिरुद्ध प्रवाह त्याच्या नाद, गति आणि झळाळीसह आयुष्यमान् करत. एकदा हे त्यांच्या असंख्य तंत्रज्ञानी केल्यावर मग डिस्नी त्या सर्व वस्तु, घटना आणि घटित यांच्यात मानवी गुणधर्म निर्माण करण्याच्या कामात निमग्न होत. त्यांचे बदक, कावळे, घुबड आणि उंदीर निरनिराळ्या मानवी प्रवृत्तींचे आविष्कार आहेत. त्यांच्या 'लिव्हींग डेझर्ट' आणि 'व्हॅनेशिंग प्रेअरी' या चित्रपटात पशुसृष्टीच्या विहार, संघर्ष, आणि जनन व विलय यांचे जे चित्रण आहे ते या पार्श्वभूमीवर पाहण्यासारखे आहे. यामुळेच समाजातल्या सर्व पातळीवरच्या आणि वयाच्या लोकाना डिस्नीने वेड लावले. कदाचित् लोकाना हे सांगितले तर खरे वाटणार नाही कीं, डिस्नीनी केवळ मुलांसाठी असा चित्रपट निर्माण केला नाही. सर्व कुटुंबासाठी आणि सर्वांसाठी त्यानी चित्रपट सादर केले. स्वतः डिस्नी एकदा म्हणाले, 'मी चित्र-पटात वाजवीपेक्षा जास्त पोरकटपणा आणत नाही. त्यामुळे माझे चित्रपट काटेकोर अर्थी मुलांचे चित्रपट नाहीत. माणसातील दोषावर थोडीशी व्याजोक्ति निर्माण करण्याचा मी प्रयत्न करतो.'



'नौदलाने' अमेरिकेला जहाज बांधणीचे काम दिले होते वाटते!

## ऋषीचे कूळ आणि मूळ पाहू नये !

अभिजात व्यंगचित्रांचे आणि व्यंगचित्रपटांचे जनक डिस्नी याना हे कसे जमले ? तसे पाहिले तर डिस्नी यांचे विशेष तांत्रिक व विद्यापीठीय शिक्षण झालेले नव्हते. प्रथमतः इमारतीच्या बांध-कामाचे कंत्राट घेणाऱ्या आणि नंतर शेतीत रमलेल्या इसमाचा डिस्नी मुलगा. त्याचा जन्म १९०१ साली झाला. डिस्नीचे बालपण शेतावर जोजले. परन्तु कृषि-जीवनात बाल डिस्नीचे मन रमत नसे. त्याच्या मनाला व्यंगरेखा व हास्यचित्रे काढण्याचा सोस होता. वयाच्या नवव्या वर्षापासून त्याने हास्यचित्रे रेखाटावयास सुरुवात केली. या अनुषंगाने एक प्रसंग त्याच्या आयुष्यात जो आला तो मोठा मजेदार आहे. प्रारंभी त्याने एका स्थानिक केशकर्तनालयाच्या जाहि-रातीसाठी हास्यचित्रे काढली. त्याबदलात त्याची फुकटात हजामत झाली ! परन्तु त्याच्या या उद्योगाने अर्थप्राप्ति काही होईना. शिक्षण कसे व्हावे ? त्याकरता तो घरोघर वर्तमानपत्रे वाटत असे. सुट्टीमध्ये रेल्वेस्टेशनावर मासिके आणि पेपरमिंटे विकण्याचा त्याने व्यवसाय केला. शालेय शिक्षण चालू असताना काही प्रमाणात छाया-चित्रणाचे शिक्षण घेतले. चित्रकलेचे अंग असे समृद्ध करून घेतले. डिस्नी व्यंगचित्रपटाकडे कसा वळला हे पाहण्यासारखे आहे. तो उपजीविकेकरता एका जाहिरात कंपनीत नोकर होता तेव्हाची गोष्ट आहे. ही नोकरी करत असताना प्रत्यक्ष चित्रपट तयार करण्याची संधि काही त्याला मिळत नव्हती. पण जेव्हा उसंत व वेळ मिळेल तेव्हा तो रेखाचित्रे काढून आणि कुणाचा तरी कॅमेरा उसना घेऊन चलच्चित्रपट तयार करू लागला. निव्वळ हौशीपायी तयार केलेले हे चित्रपट एकदा तीन स्थानिक सिनेमागृहानी विकत घेतले. ते लोकाना आवडले. आज जगभर विख्यात असलेल्या डीस्नीचा उदय असा झाला. जवळ जवळ चार दशकापूर्वी 'स्टीम-

बोट विली' या व्यंगचित्रपटद्वारा डिस्नीनी जी स्वतःची ओळख करून दिली ती उत्तरोत्तर विस्तारत आणि पक्की होत गेली. व्यंगचित्रे, व्यंगचित्रपट, जिवंत लोकांचे चित्रपट, निसर्गावरील चित्रपट, ध्वनिमुद्रिते, ग्रंथ, आणि मासिके अशी बहुविध क्षेत्रे त्यानी कामाळली. सुमारे १००० वृत्तपत्रे त्यांची व्यंगचित्रमाला प्रसिद्ध करत. आपल्याकडील 'टाईम्स' च्या रविवारच्या पुरवणीत शेवटच्या पानावर त्यांची व्यंगचित्रमाला असे व असते. सतत आणि विपुल सर्जनाची त्यांच्या सारखी यशस्वी कारकीर्द अन्यत्र सापडणे अशक्य. डिस्नीना जगातील निरनिराळ्या राष्ट्रांमधून व खुद्द अमेरिकेतून ९०० शिफारसपत्रे मिळाली. २७ वेळा ऑस्कर पारितोषिक पटकावण्याचा दुर्मिळ मान त्यानी पटकावला. चित्रसृष्टीत हे पारितोषिक मिळविणे यात कळसाचा विक्रम आहे आणि त्याचा सव्वीस वेळा 'वन्स-मोर' डिस्नीनी घेतला यात त्यांच्या यशाचे अनन्यसाधारणत्व आहे.

## एका फुलावरून दुसऱ्या फुलावर गुंजारव करणारी मधमाशी

डिस्नी यानी जी दुनिया घडविली तिच्या यशावरूनच केवळ तिची पूर्ण कल्पना येणार नाही. कारण ही दुनिया घडवणारे डिस्नी यांचे संपूर्ण व्यक्तिमत्व त्यामागे आहे. आणि हे व्यक्तिमत्व कधीच स्थिर, स्थितिप्रिय व ठोकळेबाज बनले नाही. या व्यक्तिमत्वाची ओळख केवळ त्यांच्या आयुष्यातल्या वर कथन केलेल्या धावत्या आलेखावरूनहि होणार नाही. डिस्नी यांचे व्यक्तिमत्व त्या त्या घटनेत किंवा हातात घेतलेल्या उपक्रमाच्या प्रक्रियेत संपूर्ण होत असे. परिपूर्ण राहत असे. पण तिथेच थांबून कृतकृत्यता मानत नसे. त्यानी स्वतःच म्हटल्याप्रमाणे "एका फुलावरून दुसऱ्या फुलावर गुंजारव करीत जाणाऱ्या मधमाशीप्रमाणे माझी वृत्ति आहे. मधमाशी येथे थोडे, त्यानंतर दुसऱ्या ठिकाणी थोडे पराग गोळा करते आणि अखेर पोळयात मधाचा साठा करते. माझीहि तीच वृत्ति आहे." ही वृत्ति रसिकाची आहे. याला मुक्त मनाची जोड होती. म्हणून डिस्नी यांचे वागणे व करणे कोणत्याहि संमत चौकटीत बसत नव्हते. मावत नव्हते. ज्या हॉलीवुडमध्ये डिस्नी यांचे आसन व वसन होते तिथे वागण्याचे काही रूढ रिवाज आहेत. पण डिस्नीचे रिवाज त्याना समांतर होते. डिस्नी भाड्याच्या मोटारगाडीत प्रवास करत, दुकानात खरेदी केलेले व सुरकुत्या पडलेले कपडे अंगाळत. हॉलीवूडमधील समारंभात ते क्वचितच भाग घेत. हिरवळीवर 'बोलिंग' हा खेळ खेळणे व बालकात मिसळणे हा त्यांचा विरंगुळा होता. त्यानी चाळीस वर्षापूर्वी आपली एक सहकारी लिलियन बॉन्डशी विवाह केला. अशा रितीनं सर्व बाजूने व परीने त्यांचे जीवन वेगळे होते. आणि स्वतःच्या सर्जक पृथगात्मतेमुळे ते कमालीचे मौलिकहि बनत गेले. व्यावसायिक यशाने ते संतुष्ट होत नसे. जातिवंत कलावंताचा असमाधानीपणा त्यांच्यात होता. त्यानी इ. स. १९२६ साली हॉलीवूडमध्ये स्वतःचा धंदा सुरू केला तेव्हा त्यांच्याकडे फक्त ४० डॉलर्सचे भांडवल होते. याच डिस्नीना इ. स. १९३४ साली 'स्नो व्हाईट ॲन्ड सेवन ड्वार्फ्स' या चित्रपटाने ऐंशी लक्ष डॉलर्स मिळवून दिले. इ. स. १९५४ मध्ये डिस्नी यांचे वार्षिक उत्पन्न १ कोटि १६ लक्ष डॉलर्स होते. तेच मृत्युपूर्वी दोन वर्षे आठ कोटी २० लक्ष डॉलर्सवर गेले, पण हे यश एकीकडे त्यांच्या गळयात गौरवाची माळ घालत होते तरी ते कधीच अनवधान झाले नाहीत. सडपातळ व उंच बांध्याचे, साध्या राहणीतले डिस्नी यांचे सूजल्यासारखे वाटणारे बदामी रंगाचे डोळे त्यांच्या, स्वप्नाळू वृत्तीची कल्पना देत. डिस्नी केवळ स्वप्ने पाहणारे ध्येयवादी नव्हते तर अशक्य स्वप्ने समूर्त करून दाखवणारे महान् कलाकार होते

## आधुनिक जगाचे चमत्कार

'सर्कारामा' आणि 'डिस्ने लॅंड' ही त्याची ठळक उदाहरणे होत. काहीतरी नवीन करून दाखवताना त्याने मानवी आनंदात व कुतुहलात भर पडावी या आकांक्षेने ते चलित व उत्स्फूर्त होत. यामुळेच त्याना काही नवीन कल्पना आकस्मिक रितीने सुचत. '**सर्कारामा**' ची कल्पना व योजना या अनुरोधाने लक्षणीय आहे. एकाच वेळी एका घटनेचे किंवा स्थळाचे अकरा कॅमेऱ्यांच्या सहाय्याने छायाचित्रण केले. हे चित्रण एकाच वेळी वर्तुळाकार तंबूत दाखवले म्हणजे एक वेगळा आणि अभूतपूर्व अनुभव प्रेक्षकाना मिळतो. तंबूच्या मधोमध प्रेक्षक उभे राहतात आणि सभोवार चित्रपटातील दृश्ये सरकत असतात. त्यामुळे त्या चित्रपटातल्या वातावरणात प्रेक्षक मिसळला जातो. आपण त्यापासून वेगळे असल्याची शारीरिक भावनाहि



रीहूत नाही. हा 'सर्कारामा' काही वर्षापूर्वी मुंबईस मरीन लाईन्स-लगतच्या मैदानात दाखवला गला आणि लोकांनी तो पाहण्यास रांगा लावल्या. पण डिस्नीनी सर्व जगाला थक्क करून सोडले ते आपल्या 'डिस्नी लँड'ने. अक्षरश: एका प्रतिसृष्टीची जडण-घडणच या भूमीत त्यानें केली आहे. डिस्नी लँडने ३०० एकर जमीन व्यापली आणि भूषवली आहे. या 'डिस्नी लँड' चे मूळहि डिस्नीच्या शोधक व वेधक स्वभावावर प्रकाश टाकणारे आहे. डिस्नी जेव्हा बालकांच्या बरोबर सार्वजनिक उद्यानात जात असे तेव्हा त्याच्या अनुभवास असे येई कीं ती उद्याने खरोखुरी व पूर्ण करमणूक तर करत नव्हतीच पण चौकस बुद्धीस, सौंदर्य दृष्टीस आणि भावनिक अस्मितेस पूरक खाद्य पुरवण्याच्या बाबतीत कमालीची अपूरी ठरत होती. माणसाला सतत वाढ असलेले समृद्ध जीवन हवे असते. वांच्छित असते. रोजच्या जीवनातील विसंवाद, विद्रोह, विरुपता आणि विषाद यांची जागा संवाद, स्नेह, संगीत आणि सौंदर्य यानी घ्यावी असे त्याला नेहमी वाटत असते. निरपेक्ष जीवनाचा निरामय आनंद लुटता यावा असे ठिकाण गावतच नाही. माणसे वेळ व सवड मिळताच हे मिळवण्याच्या करता सारखे धावत व शोधत असतात. मनाची तृप्ति होत नाही म्हणून थकतात. 'डिस्नी लँडने' मानवाला एक न खुरटलेले व खुंटलेले विश्व सादर केले. 'वाढ नसलेले वास्तव भौतमात्र' असते हे खरे पण त्यातच चित्त ओतले म्हणजे कार्य होते याचे प्रात्यक्षिकच 'डिस्नी लँड'ने प्रस्तुत केले. डिस्नी लँडमध्ये त्याने ६५ एकर जमिनीवर जे उद्यान तयार केले ते असे उद्यान आहे कीं पाहणाऱ्याने तोंडात बोटे घालावी. तिथे पूर्ण- आकाराचे प्लॅस्टीकचे 'जिवंत' प्राणी आहेत. ते प्लॅस्टीकचे आहेत हे मुद्दाम सांगितल्याशिवाय कुणाला खरे वाटणार नाही, इतके ते खरे वाटतात. इलेक्ट्रॉनिकच्या मुळे प्रत्येक प्राणी खरे वाटल्प्त इलेक्ट्रॉनिकच्या मुळे प्रत्येक प्राणी 'जिवंत' झाला आहे. तो त्या-त्या प्राण्याला अनुरूप अशा हालचाली करत असतो. डिस्नी लँडमध्ये एक 'फ्रॉन्टीयर लँड' आहे. त्या विभागाचे विशेष म्हणून जे नजरेपुढे येतात त्याचे हुबेहुब चित्र वास्तवात आणले आहे. एकोणीसाव्या शतकात जसे सरहद्दीवरील खेडे दिसले असेल तसे उभे केले आहे. तेथे त्या कालात जशा घोड्याच्या गाड्या होत्या तशाच दाखवल्या आहेत. केवळ दाखवल्या आहेत असे नव्हे तर भेट देणाऱ्या माणसाला किंवा प्रवाश्याला त्या गाड्यात बसून त्या खेड्यात फेरफटका मारता येतो.

## नवल नगरी आणि उद्याचे जग

चमत्कृति, भव्यता, अद्भुत रम्यता इ. इ. मानवी मनाला चटकन् स्पर्श करणाऱ्या गोष्टींच्या द्वारा माणसाचे रंजन करता करताच त्याच्या कुतुहलाची जोपासना, ज्ञानात भर आणि आनंदाची वृद्धि या गोष्टी डिस्नीनी अतुल कौशल्याने साधल्या आहेत. डिस्नी लँडमधील एक एक विभाग याची साक्ष आहे. 'मेन स्ट्रीट, यु. एस्. ए.' या विभागात आजचे आजोबा आपण मुले होतो तेव्हा अमेरिका कशी होती ते आपल्या पुढच्या चिमुकल्या पिढ्यांना दाखवू शकतात. त्या काळचे वातावरण तंतोतंत निर्माण करण्यात आले आहे. त्या काळच्या गॅसबत्त्या रस्त्यावर पेटल्या असतात. जुन्या पडक्या इमारती दिसतात. पाहता पाहता आजची मुले आजोबांच्या बालपणात कल्पनेनं जातात. त्या दुनियेत डोकावू लागतात. काही ठिकाणी छोट्या नद्या खोदण्यात आल्या आहेत आणि त्यात 'पाणबुड्या' ठेवण्यात आल्या आहेत. या पाणबुडीत बसून मुले खोल सागरात जाऊन येतात. हे अनुभवावे म्हणून अलोट रांगा लागतात, अन् रांगेत उभे राहिलेल्यांना उबग येऊ नये म्हणून अनेक कलावंत अनेक प्रकारचे वेष करून संगीतद्वारा त्यांचे मनोरंजन करत असतात. परंतु डिस्नी येथेच थांबले तर डिस्नी कसले? या भूमीत उद्याचे जग कसे असेल याच्या गगनचुंबी कल्पना साकारल्या आहेत. जीवनाला सतत वाढ आहे त्याचे सूत्र व अवधान असे राखले आहे. या 'टुमारो लँड' अर्थात् उद्याच्या जगात अवकाशयान कसे असेल ते तेथे बघता येते, इतकेच नव्हे तर त्या यानात बसून मुले अवकाशात जातात. अर्थात् हे यान कसे दिसेल याची ती. मुले कल्पना करू शकतात.

## सारे उच्चांक मोडले

—अशा डिस्नी लँडला उगाच नाही आतापर्यंत सुमारे पांच कोटि लोकानी भेट दिली आहे. अनेक राजे व राण्या, पंतप्रधान, राष्ट्राध्यक्ष, जगातल्या मोठे नेते, लेखक, कलावंत, यानीहि या डिस्नीच्या नवलनगरीला भेट देऊन स्वत:ला धन्य मानले, दरवर्षी अंदाजे पन्नास लाख लोक ही नगरी पाहावयासाठी येतात. या डिस्नीच्या नगरीत दोन हजार कायम नोकर आहेत. उन्हाळ्यात प्रेक्षकांची आणि भेट देणाऱ्यांची संख्या बेसुमार वाढते. म्हणून आणखी दोन हजार नोकर ठेवावे लागतात. अशी ही प्रतिसृष्टी निर्माण करण्याच्या उपक्रमात डिस्नीला भांडवल पुरवण्यास धनपति कचरले हे सांगितले तर विश्वास बसणार नाही. पण डिस्नीची जिद्द अशी कीं, त्याने आपल्या स्वत:च्या विम्यावर एक कोटी सत्तर लाख डॉलर्सचे कर्ज काढले आणि कामास सुरुवात केली. पुढे आणखीन्, साडेतीन कोटी डॉलर्स खर्च केले आणि सर्व जगाला चकित, रोमांचित आणि आनंदित करणारी ही नगरी संपन्न केली — आणि स्वप्नाळू ध्येयवादाच्या या प्रतिकृतिबद्दल त्याला व्यावसायिक लाभहि चांगलाच झाला. ही 'नगरी' त्याला रंगात आल्या दिवसापासून सर्व स्थानिक कर वजा जाता गुंतवलेल्या भांडवलावर आठ टक्के नफा पदरात पडू लागला. इ. स. १९६४ साली तर त्याला प्रवेशमूल्याचेच दोन कोटी सत्तर लाख डॉलर्स मिळाले.......

## शेवट होऊनहि पूर्णविराम नसलेले जीवन...

पण डिस्नी या ध्येयपूर्तीच्या व अर्थाच्या यशामुळे समाधान मानणारा नव्हता. त्याच्या नजरेला आणि कल्पनेला नित्य नूतन सृष्टि उभवण्याची तडफ होती. रंग, रेखा, छाया, नाद, लय व प्रतिमा यांच्या अद्वितीय विलासातून तयार झालेल्या विलोभनीय डिस्नी लँडने त्याच्या कर्तृत्वाला पूर्णविराम मिळाला नाही साधनांचे साध्य आणि त्या साध्याचे साधन करावे असे स्फुरण त्याच्या प्रतिभेला होते. त्याची सचेतनता इतकी ज्वलंत होती कीं ती मोठ्या व ऐतिहासिक गौरवानेहि स्थित झाली नाही. इ. स. १९६५ मध्ये त्याने फ्लॉरिडात ऑर लॅन्डोनजिक 'डिस्नीज वर्ल्ड' (डिस्नीचे जग) या दुसऱ्या प्रतिसृष्टीच्या प्रकल्पासाठी २७,००० एकर जमीन खरेदी केली. एवढ्या मोठ्या विस्ताराच्या भूप्रदेशावर तो काय काय सौंदर्य निर्माण करणार होता याची कल्पना करणे अशक्य आहे. पण यासाठी पन्नास कोटी डॉलर खर्च करण्याचा त्याचा बेत होता. याप्रमाणेच कॅलिफॉर्निया राज्यात मिनरलकिंग येथे उन्हाळ्यात व हिवाळ्यात एक विश्रांतीचे धाम बांधण्याची त्याची जी योजना होती त्यासाठी ३ कोटी ५० लाख डॉलर खर्च येणार होते. डिस्नीनी टेलीव्हिजनसाठी रंगीत चित्रपट तयार करण्याचे प्रयत्न व प्रयास चालवले होते. त्यात त्याना यशहि येत चालले होते. असे अखंड प्रयत्नाचे, प्रयोगाचे, प्रगतीचे, उत्कर्षाचे, परमोत्कर्षाचे आणि सतत वाढीचे त्यांचे जीवन होते. आणि हे सारे त्यांच्या मृत्यूने संपल्यासारखे वाटले तरी त्यातील जीवनवेधी जगण्याचे सूत्र हे अक्षय्य प्रेरणा देणारे आहे......




डॉ बाळ गांगल

# वासू धंद्यात पडतो!

**एस्. एस. सी** मध्ये आमचा परफॉर्मन्स काही फारसा चांगला झालेला नव्हता. कॉलेजातहि आपलं चार लोक घालतात म्हणून नांव घातलं. तिथं आमच्या हातून फारसं काही घडणार नाही हे शेजाऱ्यापाजाऱ्यांच्या तोंडून देवच बोलला होता. इंटरपर्यंत चार वर्षं काढली आणि मग आम्हाला दोघानाहि घरून ताकीद आली कीं झालं इतकं पुरे...शिक्षण ! आता काही स्वतःच्या पोटापाण्याचा उद्योग बघा.

कॉलेज बंद झालं आणि आम्ही पोटापाण्याचा मुख्य उद्योग सुरू केला. ॲप्लिकेशन्स लिहिण्याचा ! टाइम्समधल्या 'व्हेकण्ट सिच्युएशन्स' बघायच्या आणि अर्ज लिहायचे. आमच्या अर्जांनी पोस्टल डिपार्टमेंटचा इतका जबरदस्त फायदा झालेला आहे कीं किमान तेवढ्यासाठी आमचे दोघांचे वेगवेगळे नाही तरी निदान जॉईंट १५ नया पैशांचे स्टँप्स् छापणं आवश्यक आहे. बेकारी नष्ट करणं ही सरकारची जबाबदारी असल्यानं खरं म्हणजे नोकरीसाठी करायचे अर्ज O. I. G. S. खाली पाठविण्याची सवलत दिली पाहिजे किंवा ज्या अर्जांचं फेव्हरेबल रिप्लाय् येणार नाही, त्याचे पैसे तरी पोस्टातून परत मिळण्याची व्यवस्था झाली पाहिजे. आम्ही जर कधी सेंट्रल मिनिस्टर वगैरे झालो तर सगळ्या बेकारांसाठी ही योजना नक्की अमलात आण्.

खेड्यात जसे बाजाराचे दिवस असतात तसे आमचेहि बुधवार आणि शनिवार मोठे बिझी दिवस ! टाइम्सची दोन्हीं दोन तीन तीन पाने भरून येणाऱ्या ॲड्व्हर्टिज्मेंटस् वाचून सारा दिवस अर्ज लिहायचे. एका शनिवारी एकूण पन्नास अर्ज खरडल्यानं, त्यामुळं न लागलेल्या कोणत्याहि नोकरीची शपथ वाहून, सांगायलो मी तयार आहे. असाच एक बुधवार होता. आईच्या भाषेत 'मेलेला चहा' पिऊन मी टाइम्सची छाननी करीत होतो. इतक्यात वासू आला. माझ्या हातातला टाइम्स त्यानं ओढून घेतला आणि त्याचे फाडून फाडून तुकडे केले. अगदी बारीक बारीक. मी फक्त त्याच्याकडे पहात राहिलो. दुसरं काय करणार ? सगळे कपटे त्यानं शांतपणानं गॅलरीतून खाली फेकले.

"बाबारे, माणसानं पेपर वाचून माजावं, फाडून माजू नये" मी सुचवलं.

"आजपर्यंत पेपर वाचून कोण माजलाय् ?" वासूनं प्रश्न केला मला त्याचा नूर वेगळाच भासला.

"फाडून तरी कोण माजलाय् ?" माझा प्रतिप्रश्न.

"मी !" वासू म्हणाला, "माजणाराय् !"

"आँ ?" माझा उद्गारगर्भ किंवा असलाच काहीतरी प्रश्न.

"आजपासून अर्ज खरडणं बंद !"

"बंद ? म्हंजे ?"

"मी ह्यापुढे नोकरी करणार नाही !"

'आतापर्यंत तरी कुठे करीत होतास ?" मी.

"आतापर्यंत म्हतोच करीत पण ह्यापुढेहि करणार नाही.

"वरं. मग काय घेऊन आलायस् ?"

"म्हंजे ?" वासू.

"म्हंजे काय ? पिण्यासाठी पोटॅशियम् सायनाइड, किंवा खाण्यासाठी प्रत्येकी एकएक ग्रॅमप्युअर निकोटिन किंवा असंच काही तरी."

"कां बुवा ?"

"नोकरी करायची नाही मग ह्याशिवाय दुसरा कोणता मार्ग आहे ?"

"बोललास ?" वासू

"हो बुवा, मला तरी. . ."

"मला तरी काय ? कारकून लेकाचा ! मला वाटतं तुझा गोत्रसंस्थापक ऋषीसुद्धा कुणाकडे तरी कारकूनच असेल. दुसरं काही म्हंजे काऽऽही सुचत नाही ना तुला ?"

"नाही बुवा !"

"जरा जगाकडे बघ. पोटासाठी पैसा मिळवायचे नोकरीखेरीज थॉवजंड अँड वन् मार्ग आहेत."

"उदाहरणार्थ ?"

"उदाहरणार्थ. दरोडेखोरी, हातभट्टी, रद्दीवाला, कल्हईवाला, भाजीवाला, फायनॅन्सर, फिल्म डिस्ट्रिब्यूटर, अॅक्टर, बिल्डिंग कॉन्ट्रॅक्टर, एस्टेट एजंट, बिझिनेस कन्सल्टण्ट—अॅक्चुअली थॉवजंड् अॅण्ड वन् !"

"ह्यापैकी आपण कोणता धंदा करायचा असं ठरवलयंस् ?"

"आता वरोबर बोललास् ! 'धंदा' ! धंदा करायचा ! बिझिनेस् ! स्वत:चा. कुण्याचं फट् म्हणून ऐकायची जरूर नाही. समजलं ?"

"पण ऽऽ. . . . धंदा म्हटला म्हंजे भांडवल. . ." मी.

"रडलास ? 'वासू' मला वाटलंच होतं. माणसामध्ये 'पुश्' पाहिजे, 'डॅश्' पाहिजे, 'इनिशिएटिव्ह' पाहिजे. म्हंजे भांडवलावांचून अडत नाही."

"खरंच ! तू हे शब्द कुठून शिकलास हा मुद्दा जरी तूर्त बाजूला ठेवला तरी हे पुश्-कम्-डॅश्-कम्—इनिशिएटिव्ह आपल्यात आहे का ?"

"कां नाही ?" वासूचा उलटा प्रश्न.

"नाही, मी म्हणतो आहे का ?

"आहे, जरूर आहे. केल्याने होत. . ."

"आहे रे आधी केलेच पाहिजे. . ." मी त्याचं वाक्य पुरं केलं.

"तुला ती गोष्ट माहीत आहे ?"

"कुणाची ?"

"मेलेल्या उंदराच्या भांडवलावर खूप श्रीमंत झालेल्या माणसाची. सांगू का ? एक होता गरीब. . ."

"नको नको ! मला माहीत आहे. पण जरा विचार कर. आपण उद्या मेलेल्या उंदराच्या शेपटीला दोरी बांधून निघालो, तर आपल्या मांजरासाठी तो उंदीर विकत घेणारं गिऱ्हाईक मुंबईत आढळेल का ? आणि समज मिळालं तरी पुढे त्या पैशांचे फुटाणे घेऊन कोणत्या रस्त्यावर उभं राहिलं म्हणजे मोळीविक्ये भेटतील हे निदान मला तरी माहीत नाही. नाही, कल्पना कर, उद्या आपण फुटाणे घेऊन फ्लोरा फाउंटनला उभे राहिलो तर मोळीविक्ये कोणत्या रस्त्यानं येतील. सी. टी. ओ जवळ असतील की पर्क्स रेस्टोरांजवळ की गोदरेजच्या शोरूमबाहेर कांचेला मोळ्या लावून फूटपाथवर हाशहुश् करीत उभे असतील ?"

"झालं बोलून तुझं ?" वासू.

"झालं !"

"आपल्या मराठी माणसाचं चुकतं ते इथंच ! स्वत: काही करायचं नाही आणि दुसरा काही करू लागला तर त्याला रिडिक्युल् करायचं ! आऽऽऽज आपल्या महाराष्ट्रात बुद्धिमत्तेचा प्रचंड अपव्यय दुसऱ्याला केवळ रिडिक्युल् करण्यासाठी. . ."

"वाश्या, एकदा केव्हातरी 'तुझं आहे तुजपाशी मध्ये' आचार्यांची भूमिका तू करून 'चुकला' आहेस हे मान्य पण म्हणून. . . . .जाऊ दे मुद्याचं बोल. महाराष्ट्रातील बुद्धिमत्तेच्या अपव्ययाचा आढावा आपण तूर्तास बाजूला ठेवू !"

"मुद्दा एवढाच कीं धंदा करायचा. सुरुवात केली कीं भांडवल मिळेल, सर्व काही मिळेल. माझा निश्चय झालाय्. येशील तर तुझ्यासह, न येशील तर तुझ्याविना आणि विरोधशील तर तुला विरोधून मी आपला धंदा चालू करणारच ! 'एक्सेलशियर !' चं ब्रीदवाक्य घेऊन मी पुढे, पुढे आणि पुढेच जाणार !"

"नाही, म्हंजे तुझा एवढा निश्चय असेल तर तुला साथ देणं हे मित्र म्हणून माझं कर्तव्यच आहे, पण डोक्यात किडा आला म्हणून बोलून टाकलं एवढंच !"

"बोललास ते बरंच झालं, संशयनिवृत्ति झालेली केव्हाहि चांगलीच." वासू आज असं जड बोलत होता.



**आँ, हे काय गौडबंगाल !**
**नौदल कायदा बदलला ?**



एकूण, धंदा करायचा ही काळ्या दगडावरची म्हणजेच वासूच्या डोक्यावरची रेघ ठरली. एकदा ठरलं म्हणजे मग आपलं बुवा असं आहे कीं त्यात 'हार्ट अँड सोल' ओतून काम करायचं. दोन-चार दिवस आम्ही नुसते 'धंदा धंदा' म्हणून लगबगीने इकडून तिकडे आणि तिकडून इकडे धावत होतो. आम्हाला धंदा चढला होता. आमच्या कुणातरी शेजारणीनं आईला म्हटलेसुद्धा "असल्या (म्हणजे बेकारीमुळे डोकं फिरलेल्या) पोरांसाठी (प्रत्येकी वय वर्षे २१-२२) म्हणे ठाण्याला हल्ली वेगळाच वॉर्ड उघडलाय. एकदा मेलं दाखवून तरी आणावं !" एरव्ही एखादं बाणेदार उत्तर द्यायला आम्ही थांबलो असतो पण आता फक्त आम्ही तिची कीव केली. 'उद्या आम्ही बडे उद्योगपति (किंवा "ती") झालो म्हणजे ह्यांचेच डोळे फिरतील आणि तेसुद्धा कायमचे ! नो रेमेडी ?' असा विचार केला.

सुवर्णनियंत्रणामुळे बेकारीत निघालेल्या एका सोनाराने त्याच्या दुकानातली चार बाय् तीन फूट जागा आम्हाला द्यायचं कबूल केलं होतं. आता एवढ्या जागेत कसला धंदा 'बसवायचा' हा एक प्रश्नच होता. शेवटी अल्पभांडवली पण सद्यःफलदायी भाजीवाल्याचा धंदा करायचा, असं ठरलं. "ए, भाजीवाल्या, (किंवा 'भय्या' सुद्धा) दोन पैशांची मिरच्याकोतमीर दे आणि थोडं आलं, पुदीना आणि कडीपाता दी !" असं पोरीसोरींकडून म्हणून घ्यायचं, मनाला काय यातना होतील आमच्या ! हा विचार राहून राहून येत राहीला. पण म्हटलंच आहे 'न निश्चितार्थात्.....' वगैरे.

पण वासूच्या उत्साहाला मर्यादा नव्हत्या. "अरे महाद्या, मी तुला सांगतो. भाजीसारखा धंदा नाही. भायखळ्याहून भाजी आणायची स्वत: ! सकाळी सातपर्यंत तीन तीन खेपा पडल्या तरी हरकत नाही. थ्री हंड्रेड पर्सेंट प्रॉफिट आहे ह्या धंद्यात 'नेट्'? आहेस कुठं ?" मी कुठे होतो ? वासूबरोबर धंद्यात वहावत चाललो होतो.

एका रद्दीवाल्याकडची जुनी तागडी आम्ही काही दिवस वापरायला म्हणून आणली. 'अरे डरतोस काय' वासू मला म्हणाला. पंधरा दिवसात स्टेनलेस् स्टीलचा तराजू घेऊन टाकू. माल तोलायच्या पारड्याला आम्ही खालच्या बाजूने बऱ्याच काही वस्तू चिकटवून ठेवल्या म्हणजे मग माल खूपच जास्त दिला असं वाटायला हरकत नाही. हां ? धंदा म्हटला म्हणजे इमानदारीनं केला पाहिजे. भलताच प्रामाणिकपणा वगैरे काय कामाचा. शिवाय आडवी दांडी-मारण्याचे कसबसुद्धा आम्ही त्याच रद्दीवाल्याकडून दोन दिवस शिकत होतो. नेट् तीन किलो रद्दी निव्वळ अर्धा किलोच असल्याचं कसं भासवावं हे त्यानं आम्हाला शिकवलं. "पर तुमाला हेच्या वरुबर उलट करायचं ह्ये ध्येनात ठिवा नायतर अर्धा किलोचं पैसऽ घिऊन तीन किलो माल द्याल, हाः हाः हाः हाः......" असा बहुमोल उपदेशहि त्यानं आम्हाला दिला. त्याचा दम संपल्यावर वासूने "हाः हाः हा हाः ........" केलं आणि वासूचा संपल्यावर मी ! नाहीऽ म्हंजे, आमची थट्टासुद्धा आम्ही किती स्पोर्टिंगली (कीं स्पोर्टिव्हली) घेऊ शकतो त्याचं हे उदाहरण.

एकाद्या केंद्रीय मंत्र्याच्या शुभहस्ते धंद्याचं उद्घाटन करावं असा एक टूट निघाला होता. "अरे मंत्री संत्री काय छप्पन आणून देईन" असं आमच्या एका मित्रानं छातीवर हात ठेवून सांगितलं होतं. पण त्याची एकूण भंकसगिरी लक्षात घेऊन आम्ही तो बेत कॅन्सल केला. म्हटलं, स्वतःच्या जागेत जेव्हा धंदा शिफ्ट करू तेव्हाच मंत्री बिंत्री आणू या.

वाश्यानं कॅन्व्हासच्या भल्यादांडग्या पिशव्या कुठून पैदा केल्या होत्या कुणास ठाऊक, पण प्रत्येकीची कॅपॅसिटी पंचवीस किलोपेक्षा कमी नसावी. 'आज रोख उद्या उधार'चा बोर्ड आधी तयार केला नि प्रत्येकी दोन पिशव्या घेऊन आम्ही भल्या पहाटे भायखळ्याला गेलो.

"आपल्या मार्केटचा ट्रेण्ड आपल्याला माहित नाही तोपर्यंत पेरिशेबल माल फारसा न्यायचाच नाही" वाश्याने मला उपदेश केला. मीहि अर्थातच मान डोलावली. कांदे, बटाटे, सुरण, लसूण वगैरे मुख्य पदार्थ आणि चारदोन पालेभाज्या, कोथिंबीरीच्या वीसेक जुड्या, चार किलो मिरच्या असा माल घेऊन आम्ही वापस आलो. पाट्या मांडल्या, तराजू तयार ठेवला, उदबत्ती लावली नि वाश्या गल्ल्यावर बसला. मी आपला मदतनीस म्हणून अदबीनं बाजूला उभा राहिलो. उभ्याउभ्याच तंद्री लागली नि शेखमहंमदासारखे विचार मनात येऊ लागले. तावडतोब मी स्वतःशीच म्हटलं, 'शेखमहंमदापेक्षा आपण डोकेबाज खरे. उघड्या डोळ्यानी स्वप्न

पहायची नि पुढे हजर, नसलेल्या भावी बायकोला लाथ मारायची तर कोसामाचा धंदा खोलण्यात मतलब काय ?' तरीहि स्वतःचं मनोराज्य दूर ठेवून मी वासूच्या पायाकडे बारीक लक्ष ठेवलं. त्याच्यात काही स्फुरण मला जाणवलं नाही आणि वासूच्या पाया-समोर दुकानाचा उंबरठा असल्यामुळं जिवाला मी अलगद् भांड्यात पडूं दिलं. वासू जर रंगलाच तर त्याचा पाय चांगला सडकून निघेल, नि मग स्वप्नरंजनाची त्याची वृत्ति नाहीशी होईल ह्या विचारानं मला बरं वाटलं.

आम्ही दुकान खोलून बसलो पण लोक अजून उठलेले नव्हते. दिवस शुक्रवारचा होता. वर्तमानपत्रवाला आला नि म्हणाला "साहेब एक पेपर दुकानावर ठेवीत चला. गिऱ्हाईक हटकून येईल." कुणीतरी 'साहेब' म्हटल्यावर खूष न होणारे भाजीवाले अजून जन्माला यायचेत. "वरं वरं, टाकीत जा काहीतरी" वासू म्हणाला. 'आणि एक सुचवू का साहेब. मराठी माणसाजवळ 'मार्मिक' पाहि-जेच'. 'ठेव एक' मी म्हटलं. आधल्या दिवशी संध्याकाळी येऊन जुना झालेला 'मार्मिक'चा अंक त्याने आमच्या गळ्यात घातला, हे आमच्या उशीरा लक्षात आलं. पण मार्मिक चाळल्यावर मला 'ब्रेन-वेव्ह' आली. मी म्हणालो—

"वाशिया, मी निघालो."

"म्हंजे एवढ्यात, अरे अजून धंदा सुरूसुद्धा..."

"म्हंजून तर........." म्हणत मी सटकलो. वासू माझ्या पाठीकडे 'आ' वासून पहात राहिला असावा.

रस्त्यावरून पळत सुटलो. अजून एकहि दुकान उघडलं नव्हतं. काय म्हणावं लोकांच्या ह्या आळशीपणाला ! शेवटी एक दुकान-दार दुकानाची एक फळी काढताना दिसला. मी धापा टाकीत उभा राहिलो. 'शेटजी लवकर उघडा, नि मला एक मोठासा कार्डबोर्ड द्या.' कार्डबोर्ड घेतला, लाल शाई घेतली नि मोठ्या अक्षरात लिहिलं.

मराठी माणसानी, मराठी माणसांसाठी
मराठी वाण्याने चालविलेले अस्सल
मराठी बीजाच्या भाजीचे दुकान.

धावत परत आलो. बोर्ड पाहिल्याबरोबर वासू खूष. "महाद्या," तो म्हणाला, "आहे, आहे ! तुझ्याहि डोक्यात देवानं थोडा करडा भाग घातलाय म्हणायचा !"

'मऽऽऽग, तुला काय वाटलं ?" मी गर्वानं विचारलं.

"अगदी खरं सांगू, मेंदूच्या जागी एक सुरेखसा व्हॅक्युम् असावा तुझ्या डोक्यात, अशी माझी प्रामाणिक समजूत होती."

हळूहळू गिऱ्हाईकं येऊ लागली. दुकान मराठी वस्तीत असल्यानं आठच्या सुमारास ही झुंबड उडाली. विक्रीचा रेट (मराठी आणि इंग्रजी) पाहून आमची हृदयं डांगर भोपळ्यासारखी टरारून फुगली. वासूनं एकदा मान उडवून सुचवलं, "काय कसा काय चाललंय् धंदा !" नि मीहि बोर्डाकडे पहात डावा डोळा मारला नि पुटपुटलो "पण ही आयडिया कुणाची ? एकंदरीत 'आनंदीआनंदगडे इकडे तिकडे चोहिकडे' असं झालं होतं आम्हाला. मी वासूवर खूष होतो, वासू माझ्यावर खूष होता. आम्ही गिऱ्हाईकांवर खूष होतो, गिऱ्हा-इकं आमच्यावर खूष होती. साडेनऊच्या सुमारास पेरिशेबल भाजी खलास. दहाच्या सुमारास उरलेले टोमॅटो खाऊन टाकले. शिल्लक मालाचं स्टॉक टेकिंग केलं नि गल्ला मोजला. वासूच्या म्हणण्या-प्रमाणे थी हंड्रेड पर्सेंट नसला तरी बराच फायदा झाला होता. "वुई डिझर्व्ह अ ट्रीट् ! व्हॉट ?" मी म्हटलं "या ! व्हाय् नॉट ?" वासू स्टायलिश म्हणाला.

पैसे भाजी विकून मिळालेले असले तरी 'ट्रीट' मात्र आम्ही 'प्रीतम्' मध्ये कोंबडी खाऊन घेतली. 'ट्रीट म्हंजे ट्रीट' तिथे शाक-

---

Statement about ownership and other particulars about newspaper "Dipavali" Monthly
FORM IV (SEE RULE 8)

| | |
|---|---|
| 1. Place of publication... | Dalal Art Studio, 42, Kennedy Bridge, Bombay—4. |
| 2. Periodicity... | Monthly, on 1st of every month. |
| 3. Printers' Name... | Shri Dinanath Damodar Dalal. |
| Nationality... | Indian. |
| Address... | 42, Kennedy Bridge, Bombay—4. |
| 4. Publishers' Name, Nationality and Address... | As per 3 above. |
| 5. Editor's Name, Nationality and Address... | As per 3 above. |
| 6. Names and addresses of individuals who own the newspaper and partners or share-holders more than one percent of the total capital. | Shri Dinanath D. Dalal, Sole proprietor. No partners or Shareholders. |

I, Dinanath Damodar Dalal, hereby declare that the particulars given above are true to the best of my knowledge and belief.

Date 1-3-1967

**D. D. Dalal**
Signature of publisher.

अनुक्रमणिका

भाजी काय कामाची!

पुरपाच दिवस धंदा उत्कृष्ट चालला. काही गिऱ्हाइकं बांधल्यासारखीसुद्धा झाली. त्यात एक डाव्या गालाला गोड खळी पडणारी मुलगीसुद्धा होती. मुलगी म्हंजे तरुणी. ती तिसऱ्या दिवशी दुकानावर आलेली असताना वासू तराजूजवळ होता. तिने चारशे ग्रॅम बटाटे मागितले नि काटचाकडे पाहण्याऐवजी गोड खळीकडे पहात असल्याने वासूने जवळजवळ सातशेपन्नास ग्रॅम बटाटे पारड्यात घातले, आणखी एक बचकभर घालणार इतक्यात मी त्याचा हात धरला नि बटाटे काढून घेतले. मी त्याच्या एका हातातून बटाटे काढतोय् तो दुसऱ्या हाताने त्याने पारडं तिच्या बास्केटमध्ये रिकामं केलं. 'पैसे उद्या देईन हं' म्हणून खळीचा खड्डा आणखी अर्धा सेंटिमिटर खोल होईल अशा पद्धतीने हसत ती निघून गेली. ती गेली तरी वाश्या आपला खळीतच रुतलेला.

"वाश्या" मी ओरडलो. एक नाही, दोन नाही!

"वाश्या", मी पुन्हा ओरडलो. तरी ह्याचे डोळे खड्ड्यातच लागलेले, खळीच्या.

"वाश्या" अनावर रागाने त्याच्या पोटावर एक बटाटा फेकून मारीत मी पुन्हा म्हणालो, "तुझी माझी पार्टनर–शिप संपली. माझ्या वाटचाचं भांडवल नि माल टाक. मी चाललो."

"आँ ?" वासूने प्रश्नार्थक आ पसरला.

"आँ-बी काही नाही, मी चाललो."

"बरं पण लवकर ये. गर्दीच्या वेळेला बरा बुवा जातोस."

म्हंजे मी जे काही बोललो ते त्याच्या गावीहि नव्हते. एवढा गंभीर निर्णय मी तडकाफडकी घेऊन टाकला होता तरी त्याला आपलं वाटत होतं मी आपला जरा जाऊन येतोय्.

"वाश्या, हा धंदा कुणाचा आहे ?" मी

"कां बुवा ? आपल्या दोघांचा !" वासू

"मग ?" मी

"मग काय ?" वासू

" 'मग काय' काय ?" मी

"नाही म्हंजे तुला डाउट कां आला ?" वासू

"डाउट्चा प्रश्न नाही ! तू मला काय स्लीपिंग पार्टनर समजतोस. काय ?"

"नाही बुवा !" वासू

चांगला डोळयात तेल घालून सताड जागेपणी मी तुझ्या बरोबरीने खपतोय नि तू हे काय चालवलं आहेस?",

"काय?" वासू म्हणाला. तितक्यात दोन पैशांची कोथिंबीर वरती पुदीना, आलं नि थोडासा कढीलिंब मागणारं एक गिऱ्हाईक, शंभर ग्रॅम टोमॅटोवालं दुसर नि पालकची पंधरा पैसेवाली जुडी दहा पैशाला द्याच म्हणून हटून बसलेलं नि पालकच्या पानावरील प्रत्येक भोक आमच्या नजरेस आणणारं तिसरं अशी गिऱ्हाइकं आली नि 'गिऱ्हाइकांचा संतोष हेच आमचे कर्तव्य' असल्यानं वैयक्तिक भांडण पोस्टपोन् करून मी माल दिला. गिऱ्हाईकांची बोळवण झाल्यावर पुन्हा वासूकडे वळलो.

"वाश्या बापालासुध्दा उधार माल द्यायचा नाही असं ठरलं होतं ना आपलं?" मी विचारलं

"ठरलं होतं ? म्हंजे कुणाच्या बाबतीत एक्सेप्शन करण्याचा बेत आहे कीं काय तुझा? ते नाही जमायचं हं! प्रिन्सिपल् म्हंजे प्रिन्सिपल्!" मी शांतपणे ऐकत राहिलो.

"वाश्या, त्यातली एक मिरची उचल नि कुस्करून डोळयात घाल," मी म्हणालो, "म्हंजे मी झोपेत बोलतोय् की तू स्वप्नात आहेस ह्याची एकदा शहानिशा घेऊन जाईल."

"काय म्हणतोय्स् काय?" वासू.

"म्हणत काही नाही. चारशेच्या जागी आठशे ग्रॅम बटाटे त्या पोरीला दिलेसच नि शिवाय वरती उधार!"

"कोणत्या पोरीला?" वासू

"त्या खळीवाल्या..." मी

"खरं म्हणतोस! अरे मग त्याचा एवढा अफसोस कशाला? अरे, कुदरतीनं बनवलेल्या हुस्नोशबाबला आपल्या हातून चारशे ग्रॅम बटाटयांची दाद पोचली तर तुझा अगदी हिशेबी वासूअण्णा कां झाला? अरे, चारशे ग्रॅम बटाटयांची बात ती काय नि तू ऊधम मचवून राह्यलायस् राज्य गमावल्यासारखा." वासूच्या अंगात 'काकाजी' संचारला.

"वाश्या फाजीलपणा पुरे ! आय् ॲम् डेड् सीरियस्! सौंदर्याची पूजा चारचारशे ग्रॅम कांदेबटाटयांचा किंवा मिरच्या कोथिंबिरीचा नैवेद्य दाखवून करण्यासाठी आपण दुकान घालून नाही बसलो."

"बरं बुवा, चुकलो. पुन्हा नाही असं व्हायचं" वासूनं कान पकडून 'तोबा' केल्यावर आपण तरी बोलणार काय?

दुसऱ्या दिवशी दुरूनच ती पोरगी दिसल्यावर काही तरी

*जनता*

मुकी बिचारी
कुणी हाका
जनता ! जनता !
नच शंका



चिव् चिव् चिमणी
जनता रे जनता रे
कुणीच नाही
त्राता रे त्राता रे !

निमित्त काढून मी वाश्याला घरी पिटाळला नि आदल्या दिवशीची उधारी चुकती करण्यापूर्वी कोथिंबिरीची एक काडीसुद्धा देण्याचं नाकारलं. तिनं खळीच्या तिन्हीहि डायमेन्शन्स वाढवून बघितल्या नि फोर्थ डायमेन्शन् म्हणून खूप 'काळ' पर्यंतहि खळी गालावर टिकवली पण मी नळलो नाही. खळी-बिळी असेल, आपल्या घरची! इथं काय निर्च? शेवटी पैसे देऊन काहीतरी पुटपुटत ती निघून गेली.

वाश्या येऊन गल्ल्यावर बसला, पण अस्वस्थ होता. दुकान बंद करायच्या वेळेपर्यंत चुळबुळत होता. शेवटी बोललाच.

"ती येऊन गेली का रे ?"

"ती कोण ?" मी मख्खपणे विचारलं.

"ती रे. . . ." वासू.

"कोण ती ?" मी

"ती खळी. . ." वासू लाजला.

"हो, आली होती !" मी अधिक ताणून धरलं नाही.

"काय म्हणाली ?" वासू उत्सुक.

"म्हणणार काय दगड ? उधारी आपण बुवा वसूल केली !"

खांदे उडवून "महाद्या, महाद्या" एवढंच वासू बोलला.

पुढले दोनतीन दिवस ती दिसली नाही पण गल्ला मोजून माझ्या हाती सुपूर्द केल्यावर वासू कुठे गायब होऊ लागला. चौथ्या दिवशी भायखळ्याहून भाजीच्या तीन खेपा आणून माल लावून झाल्यावर जरा हुश्श करीत नि पावणा चहा मारीत बसलो होतो. इतक्यात् वासू म्हणाला, 'जरा जाऊन येतो' नि गेला.

पंधरा एक मिनिटानी एक भलामोठा पोस्टर घेऊन वासू नि त्याच्या मागोमाग खळीवाली अशी मिरवणूक दिसली. खळीवालीच्या हातात कसलातरी गठ्ठा होता. माझ्या पोटात भीतीचा गोळा उठला. वाश्यानं ह्या पोरीला धंद्यात पार्टनर् बिटनर करून घेतलंय् कीं काय अशी शंका आली. मिरवणूक दुकानाशी पोचल्यावर मी गंभीर चेहऱ्याने त्या दोघांकडे एक तिरकस दृष्टिक्षेप केला नि गपचूप गल्ल्यावर बसून राहिलो.

माझा 'मराठी माणसानी. . .' वगैरेचा पोस्टर खाली उतरण्यात आला. त्याच्या जागी 'लुंगी विरोधी सेना ! सैनिक नोंदणी चालू ! शाखा प्रमुख सुनंदा रावते. भेटा !' हा बोर्ड चढला. 'तर ही सुनंदा रावते. अच्छा !' मी मनात म्हटलं. सुनंदाच्या हातातला गठ्ठा अदबीनं घेऊन वासूनं सोडला नि त्यातून पावतीपुस्तकं बाहेर पडली. आम्हाला मिळालेल्या तुटपुंज्या जागेतली अर्धी जागा त्या सटवीनं व्यापली. माझ्या तळपायाची आग मस्तकाला गेली. वासूकडे लाल डोळे वळवून मी बोलणार तो तोच म्हणाला—

"महाद्या— आय् मीन् - महादेव ह्या कुमारी सुनंदा रावते, माझा मित्र महादेव."

"अय्या मी चांगलंच ओळखते कीं याना." सुनंदा म्हणाली नि तिनं पुढाऱ्यासारखे हात जोडले. मी हात जोडले नाहीत. आम्ही दुकानाची आवरा आवर करून निघालो तरी सुनंदाची सभासदनोंदणी चालूच होती. अर्थात् दुकान बंद न करता तिच्यावर सोपवूनच आम्हाला जावं लागलं. जरा दूर गेल्यावर मी वाश्याला खूप झाडला, म्हटलं "तुला नीटपणे धंदा करायचाय् की धंदे करायचेत्?" तो म्हणाला.

"महाद्या, मुंबईवर होत असलेलं लुंगीवाल्यांचं आक्रमण लक्षात घे."

"घेतलं !" मी खवचटपणे म्हणालो.

"उद्या मराठी माणूस मुंबईत औषधाला सांपडणार नाही."

"वाश्या, वाश्या ! ती सगळी आर्ग्यूमेंट्स् मला माहीत आहेत. पण आपला चांगला चालू लागलेला धंदा बुडवून लुंगीविरोधी सेनेच्या हालचाली करू लागलो तर उद्या आपणच औषधं प्यायला शिल्लक राहणार नाही."

"महाद्या, जरा व्यक्तिस्वार्थाचा विचार सोडून अखिल मराठी समाजाचा विचार कर. . . . . . . . . ." वाश्या पोपटासारखा बोलत होता.

"पुरे, पुरे !" शेवटी असह्य होऊन मी कानावर हात ठेवले. "अरे आपल्या बापजाद्यानी कधी न केलेला हलका समजला जाणारा भाजीपाल्याचा धंदा आपण खोटी लाजलज्ज्या गुंडाळून सुरू केला. तो चांगला चालू लागला. असाच तो चालवीत राहून दोन मराठी कुटुंबाचे तरी पाय मुंबईत भक्कमपणे रोवणं महत्त्वाचं की सैनिक नोंदणी करणं ?"

"अरे पण तेहि काम कुणीतरी करायला हवंच ना !"

"हवं ना ! पण ते कुणीतरी, आपण नव्हेत ! त्यातून तुझा निश्चय पक्का ठरला असेल तर ठीक आहे. गो अँहेड् ! पण मी मात्र उद्यापासून दुकानात पाऊल ठेवणार नाही. पुन्हा अर्ज खरडायला सुरुवात ! लुंगीवाल्यांच्या मेळाव्यात कुठे कारकुनी जॉब मिळतोय् का पहायला !"

"तुझी मर्जी !" वाश्या म्हणाला नि चालू लागला.

पंधरा दिवस मी वासूच्या घरी किंवा दुकानावर फिरकलो नाही. नंतर एक दिवस वासू आला. वाळल्यासारखा दिसत होता. डोळे खोल गेलेले होते. तीन दिवसांचं प्राणांतिक उपोषण केल्यासारखा चेहरा दिसत होता. आला, बसला ! मी काही बोललोच नाही. बराच वेळ तो नुसता बसून राहिला.

"महादेवा ! It's all off!" तो म्हणाला.

"मला माहितच होतं." मी म्हटलं

"काय ?" वासूनं विचारलं.

"दुकान बुडवलंस् ना ?" माझा प्रतिप्रश्न

"त्याचं काहीच नाही रे !" वासू शांतपणे बोलला. मी भडकायचं नाही असं ठरवलेलं असून भडकलो.

"त्याचं काहीच नाही ?" मी ओरडलो "भाजीच्या पोतंबजा पिशव्या भायखळ्याहून इतके दिवस वाहिल्या त्याचं काहीच नाही? तुला काय म्हणा ! दगडाला कशाचं काय वाटणार ?

"असं म्हणू नको रे," वासू काकुळतीला येऊन बोलत होता. "तू असतास तरी दुकान उठवावंच लागलं असतं !"

"कां बुवा ?" मी.

"अरे गोल्ड कण्ट्रोल ऑर्डर उठली ना ! सोनाराचा धंदा पुन्हा तेजीत सुरू झाला. नि शिवाय सेनेच्या ऑफिसचा नाही म्हटलं तरी त्याच्या रुटुसुटु चाललेल्या धंद्याला न्यूइसन्स् होताच,"

"असायचाच !" मी

"पण त्याचंहि दुःख नाही !" वासू

"मग तरीहि तुझा चेहरा शेणात माखलेली वहाण मारल्यासारखा कां ?" मी.

"सुनंदा !" वासू.

"काय, खपली का !" मी

"नाही रे ! पण काल दुकानाची शेवटची आवराआवर करताना मी तिला घोगऱ्या आवाजात विचारलं, 'हम एक नया घर बसाएंगे, एक नई दुनिया बसाएंगे। उसमे नन्हे नन्हे. . . .' पण तिनं पुरतं ऐकूनहि घेतलं नाही. म्हणाली, पहिल्यापासून मी तुम्हाला भाऊ मानलंय्. लुंगीविरोधी सेनेचा प्रत्येक सैनिक मला भावाप्रमाणे आहे, वगैरे वगैरे !"

"मऽऽऽऽऽऽऽ ग?" मी विचारलं.

"मग काय ? सारं संपलंच की !!"

●●●

# दिवाळी अंकांतील विनोदी लेखन

--शां. शं. रेगे




**दिवाळी** अंकांतील साहित्याची समीक्षणाच्या हेतूने तपासणी करणे हे एक महाकठीण काम आहे. त्यातल्या त्यात विनोदाची समीक्षा करण हे तर एक दिव्यच आहे. प्रचलित साहित्य-प्रकारात काव्य हे चटकन् उमगता येत (आणि टाळताही येते.) नाटय त्याच्या लेखनपद्धतीमुळे सहज निवडता येते; गंभीर, वैचारिक, तात्विक, शास्त्रीय इत्यादि गद्य लेखनही त्याच्या शीर्षकावरून व बोजड लेखन पद्धतीमुळे सहज उमगू शकते; कादंबऱ्या व लघुकथा त्यांच्या आकारावरून, लेखकांच्या कीर्तीमुळे व संपादकीय वर्गवारीमुळे ओळखणे सुलभ होते. पण विनोद हुडकून काढताना मात्र रसिक वाचकाची विनोदबद्धि आणि संशोधकवृत्ति कसास लागते. आपल्या अंकातील साहित्याची अनुक्रमणिकेत वर्गवारी करताना संपादकच जिथे अनेक वेळा फसलेले आढळतात, तिथे बिचाऱ्या वाचकाची फजिती झाली तर नवल कसले?

दिवाळी अंकाची जाहिरात करण्यापासून विनोदाची सुरुवात होते. तुफान विनोदी, बेफाम, अफाट ह्या परिचित विशेषणांपासून तो उदरविदारक, हास्यस्फोटक, ऊरफाटक इत्यादि गीर्वाण गौरवपूर्ण दिवाळी अंकाच्या जाहिराती झळकू लागताच वाचक जागृत होऊ लागतो. नांवनिशीवार प्रसिद्ध होणाऱ्या जाहिरातींमुळे कित्येकदा हवकूनही जातो. अनेक अंकांच्या जाहिरातीत तीच तीच प्रथितयश नांवे वाचून त्या लेखकांच्या साहित्य निर्मितीच्या कुवतीचा त्याला अचंबा वाटतो. अखेर हळूहळू हे दिवाळी अंक प्रसिद्ध होऊ लागतात. आणि प्रसिद्धीबरहुकूम फक्त किंमतच तेवढी खरी असल्याचे आढळल्यावर (आणि तेंही फार उशिरा) तो वाचक ह्या संपादकीय विनोदाच्या पहिल्याच धक्क्याने जमीनदोस्त होतो. ह्या उपक्रमात संपादक शिव्याशापांचा धनी ठरतो. पण आश्वासित आणि श्वासकासित लेखकांच्या असहकारामुळे त्याची ही स्थिति करुणास्पद होते. मागणीपेक्षा पुरवठा कमी असणे ही समस्या अर्थशास्त्राइतकीच साहित्यशास्त्रातही ज्वलंत ठरू शकते ह्याचा प्रत्यय संपादकाइतकाच वाचकांनाही येतो. आणि ह्या अनुभवामुळे शहाणे झालेले संपादक विनोदाच्या वाटेला न जाण्याची प्रतिज्ञा करून गंभीर (म्हणजेच उच्चभ्रू साहित्याने नटलेले) कलात्मक अंक प्रसिद्ध करतात.

कांही संपादक सगळ्या प्रकारच्या वाचकाना संभाळावे म्हणून संमिसळ अंक काढून त्यात दर्जेदार कथांच्या व लेखांच्या जोडीला व्यंगचित्रे, रंगचित्रे, मर्मचित्रे, वात्रटिका, पानपूरके इत्यादींची कलात्मक गल्लत करून अंकाची पाने हातचलाखीने भरून काढतात. दिवाळी अंकांच्या निर्मितीची ही कथा एकंदरीत रहस्यमय (म्हणज अखेरपर्यंत वाचकाला बुचकळ्यात पाडणारी अशी) असते, असे अनुभवाने सिद्ध झाले आहे. असो.

यंदाच्या वर्षी एकूण १४८ दिवाळी अंक प्रसिद्ध झाले. त्यात काही जुने होते व काही अगदी नवीन होते. काही दैनिकांचे, साप्ताहिकांचे, पाक्षिकांचे, मासिकांचे खास अंक होते तसेच काही फक्त वार्षिकही होते. गेल्या वर्षी नवीनच निघालेले काही अंक एकप्रयोगी ठरूनही यंदाच्या नवनिर्मितीत खंड पडला नाही. ह्यापैकी काही अंक घाऊक विनोदी, काही अर्धवट विनोदी, काही फुटकळ विनोदी तर काही विनोदाभावी होते. 'आवाज', 'विनोद', 'जत्रा', 'मोहिनी', 'बुवा' हे घाऊक विनोदी गटातील प्रमुख आणि 'मौज,' 'अभिरुचि', 'रत्नप्रभा' हे अविनोदी गटातले उल्लेखनीय. स्त्रियाना विनोदबुद्धि नसते हे पटवण्यासाठीच की काय यंदा स्त्री मासिकाचा दिवाळी अंकही गंभीर निघाला होता. उरलेले अंक संमिश्र स्वरुपाचे होते. आकडेवारीचा आधार घेऊन, आणखी असेही सांगता येईल की उल्लेखनीय विनोदी साहित्य ज्यात प्रसिद्ध झाले असे सुमारे बत्तीस अंक यंदा प्रसिद्ध झाले व त्यातल्या एकूण विनोदी साहित्याची (म्हणजे फक्त लेख व कथा यांची) निर्मिती १४४ होती. हा सर्व आकडेवारीचा तपशील श्रोत्यानी माझी कीव करावी म्हणून दिलेला नाही हे सूज्ञांस सांगणे नकोच.

यंदाच्या दिवाळी अंकातील विनोदी साहित्याचे विवरण केले तर लेखांपेक्षा विनोदी कथाच अधिक आहेत असे आढळून येते. ह्या विनोदी साहित्याची विषय-तपासणी केली तर त्यात ग्रामीण आणि नागरी विनोदी कथानके प्रामुख्याने आढळतात. 'राजश्री' मासिकात आलेली पद्माकर गोवईकर ह्यांची रामवनवासाच्या पार्श्वभूमीवर आधारलेली 'वनवास हा सुखाचा' ही कथा आणि मोहिनीमधील चंद्रशेखर मराठ्यांची 'परमेश्वर निवडणूक लढवतो' ही कथा ह्या फक्त दोनच पौराणिक वळणाच्या वाटतात.

ग्रामीण कथातही विविध प्रकार आढळतात. काही ग्रामीण व्यवहाराबद्दल ग्रामीण बोलीत लिहिलेल्या आहेत तर काहीत पार्श्वभूमी तीच असूनही शिष्ट भाषेचा उपयोग केला आहे. बहुतेक सर्व ग्रामीण कथा देशावरच्या गावातल्या रीतिव्यवहारावर प्रकाश

टाकतात. 'विनोद' मासिकातील पंढरीनाथ रेगे ह्यांची 'वसुलीची पेज' ही दर्जेदार कथाचे फक्त कोंकणच्या पार्श्वभूमीवर चितारलेली आहे. यंदाच्या ह्या ग्रामीण कथांतल्या उल्लेखनीय कथा अशा आहेत: शंकर पाटील ह्यांची 'साधना' मधील 'डेलिगेशन'; सुभाष भेण्डे ह्यांची 'बुवा'मधील 'एका ज्ञानदानाची विलापिका', रा. रं. बोराडे ह्यांच्या 'जत्रा'मधील 'मिटींग' आणि 'बुवा'मधील 'सत्कार'; पद्माकर गोवईकरांची 'दीपावली' मधील 'पवारवाई,' मधुकर सातारकरांची 'बुवा'मधील 'चटक', आनंद यादवांची 'जत्रा' मधील 'छंद असा करावा', बाळ गाडगीळांची 'आवाज'-मधील 'अकलेच्या कांद्याची गोष्ट', म. गो. पाठक ह्यांची 'शाम-सुंदर'मधील 'चौदाच इंजेक्शने', विठ्ठल चलवादी ह्यांची 'सुदर्शन'-मधील 'चले ग राणी,' सदाशिव आठवले ह्यांची 'हंस'मधील 'एका संस्कृतीची गोष्ट' आणि वसंत सबनीसांच्या 'आवाज'-मधील 'शिकार बकऱ्याची', 'किर्लोस्कर' मधील 'असा वाघ असा शिकारी' आणि 'हंस'मधील 'केरवा'. अलिकडच्या ग्रामपंचायतीच्या अनुभवांवर आधारलेल्या शंकरराव खरातांच्या 'साधना'-मधील 'साहेब आपल्याच शेरा तेवढा राहिला,' 'पैंजण' मधील 'गुणकारी औषध' आणि 'बुवा' मधील 'सरपंच शाळा तपासतात' ह्या तीनही कथा सूक्ष्म निरिक्षणाने आणि मार्मिक उपहासात्मक लेखनशलीने नटलेल्या आहेत. बापू कुंभोजकरानी 'सुदर्शन'-मधील 'कुरघोडी', व 'बुवा' मधील 'भीक नको पण कुत्रे आवर' ह्या कथांतून इतिहासजमा झालेल्या संस्थानी वातावरणाचे केलेले मार्मिक चित्रणही रंगतदार आहे. होतकरू लेखकांपैकी लोकसत्तेच्या कथा-स्पर्धेत पहिले पारितोषिक मिळालेली वसंत कुंभोजकरांची 'विहीरीची चोरी' ही कथा त्यांच्या उज्ज्वल भविष्याची साक्ष देते.

मराठी बहुसंख्य (म्हणजेच अल्पसंख्य) विनोदी लेखक नागरी जीवनात मुरलेले असल्यामुळे साहजिकच त्यांच्या लेखनात नागरी व्यक्तिचित्रे, घटना व व्यवहार ह्यांचा प्रकर्ष आढळतो. जयवंत दळवी, रमेश मंत्री, बाळ सामंत, डॉ. वर्टी, वि. आ. बुवा, बाळ गाडगीळ, शामराव ओक, द. पां. खांबेटे, इंद्रायणी सावकार, कमला फडके व वि. वि. बोकील इत्यादि विनोदकारांचे बहुतांश लेखन ह्याच नागरी गटातले आहे. वसंत सबनीस आणि ग. ल. ठोकळ मात्र ग्रामीण आणि नागरी ह्या दोनही गटांत समर्थपणे व सारख्याच कुशलतेने वावरताना आढळतात सबनीसांचा 'ज्ञानेश्री'मधील 'माझा जलसंघर्ष' आणि ठोकळांची मोहिनीमधील 'मुखवटे आणि मुखवटे' ह्या कथा ह्या विधानाची सार्थता पटविण्यासाठी पुरेशा आहेत.

ग्रामीण व्यवहारात ग्रामपंचायत हा जसा कधी न संपणारा विनोदाचा विषय झालेला आढळतो तसाच नागरी वातावरणात 'सचिवालय' हाही एक कुचेष्टेचा विषय म्हणून विनोदी लेखकांच्या हातातला हुकमी पत्ता ठरला आहे. रमेश मंत्र्यानी मागे सचिवालयात हत्ती घुसवल्यानंतर आता सचिवालयाचा मार्ग विस्तृत झाला आहे. यंदा त्यानीच 'हास्य-पर्मिट' ह्या 'दीपावली'तल्या कथेने पुन्हा एकदा सरकारी कारभाराचा समाचार घेतला आहे. बाळ सामंतांनीही यंदा दोन कथा ह्याच सचिवालयाचे लक्ष्य करून लिहिल्या आहेत. ह्यापैकी 'सचिवालयात संत तुकाराम' ही 'मोहिनी' मधली त्यांची कथा अधिक रंगतदार व निर्भेळ उपहासात्मक अशी आहे. 'आवाज' मधील 'एका मंत्र्याची रोजनिशी' ही त्यांची कथा अधिक विदारक असली तरी फक्त 'जाणत्या' वाचकांनाच उमगेल अशी आहे. वि. आ. बुवांचा 'सह्याद्री' मध्ये आलेला 'सरकार, एक कॉलमात्मक अभ्यास' हा लेख त्यांच्या पाल्हाळाच्या सोसामुळे आणि विषयांतराच्या दोषामुळे अगदीच ठिसूळ झाला आहे. बुवांच्या लेखनातला हा जाणवणारा दोष कमी झाला तर त्यांच्या कोटीबाज शैलीमुळे, कल्पक व मार्मिक शोधबुद्धीमुळे आणि उपहासात्मक हाताळणीमुळे त्यांचे लेखन अधिक दर्जेदार होऊ शकेल.

निवडणुकीचे राजकारणही काही विनोदी लेखकानी एक सुलभ साधन म्हणून यंदा वापरलेले आढळते. रमेश मंत्री ह्यांचा 'लोकसत्ते'मधील 'लोकप्रिय उमेदवार;' बाळ गाडगीळ ह्यांचा केसरीमधील 'विरोधी पक्षीयांस हितोपदेशाचे चार शब्द'; वि. आ. बुवा ह्यांचा 'मोहिनी' मधील 'येथे पुढारी (वि) घडविले जातात'; राम कृ. जोशी ह्यांचा 'मोहिनी' मधील 'आतले आणि बाहेरचं' हे सर्व लेख अंशात्मक विनोदी वाटतात. अपरिचित विषय, निष्कारण लांबण, ओढून ताणून केलेल्या हरदासी कोटचा आणि प्रच्छन्न लक्ष्यवेधासाठी कथानकात उगीच घुसवलेल्या घटना व पात्रे इत्यादि निर्भेळ विनोदास मारक ठरणाऱ्या दोषांनी उपर्युक्त लेखन परिपूर्ण असल्यामुळे हास्यस्फोटक होण्याऐवजी ते हास्यास्पदच कसे झाले आहे ह्याची प्रचीति वाचकांस सहज येईलच. 'सचिवालय' आणि 'निवडणूक' ह्या यंदाच्या सवंग विषयावर दर्जेदार विनोदी लेख लिहिले आहेत ते विनोदकार म्हणून न गणल्या गेलेल्या दोन लेखकानी. रविंद्र पिंगे ह्यांचा 'सचिवालय, एक थंड हवेचे ठिकाण' हा 'मनोहर' मधील लेख तर खुद्द संपादकानाही विनोदी वाटला नाही हे अनुक्रमणिकेतील वर्गीकरणामुळे स्पष्ट असले तरी तो व 'मोहिनी' मधील चंद्रशेखर मराठचांची 'परमेश्वर निवडणूक जिंकतो' ही कथा यंदाच्या उल्लेखनीय विनोदी साहित्यात अग्रेसर गणल्या जातील ह्यात संदेह नाही.

अलिकडच्या विनोदी लेखनात काही प्रथितयश व्यक्तींवर प्रगट अथवा प्रच्छन्न टीका आणि हीन उपहास करण्याची प्रवृत्ति अधुनमधून डोकावताना दिसते. 'गुर्दाव'सारखी मार्मिक विडंबनात्मक कथा लिहिणाऱ्या आणि यंदा 'अकलेच्या कांद्याची गोष्टी'तले भोपळे गुरुजींचे व्यक्तिचित्र कसबाने रंगविण्याची कुवत असणाऱ्या बाळ गाडगीळानी कुणाच्या तरी भीडेस्तव 'आम्ही थापाडे कसे झालो' हा रटाळ लेख लिहून आपले हसे मात्र करून घेतले आहे. अशाच तऱ्हेची प्रवृत्ति श्री. पारगावकरांच्या 'विनोद'मधील 'अवतारी पुरुषाची लक्षणे' ह्या आणि अनंत

मनोहर ह्यांच्या 'बुवा'मधील 'ऐतिहासिक कादंबरी' ह्या लेखात प्रकर्षाने आढळते. अप्रस्तुत, वोथट आणि ढोबळ शरसंधानामुळे सावज निसटून जातेच पण फाजील उत्साहाने नेमबाजीला सिद्ध झालेला शिकारी शिराळशेटी ठरून हास्यविषय कसा होतो ह्याचा प्रत्यय अशा लेखानी सहज मिळू शकतो.

नागरी जीवनातील घटनांवरील हुकमी विनोदी लेखन करणाऱ्या लेखकांपैकी जयवंत दळवी ह्यांचे विविध विषयावरील यंदाचे लेखन त्यांच्या आजवरच्या कीर्तीस साजेसे आहे. 'आवाज'-मधील 'आम्ही गणपतीच', 'विनोद'मधील 'विटूकाकांचा नवा धंदा', 'मोहिनी'मधील 'सभ्य गृहस्थहो', 'रत्नदीप'मधील 'चोरी कधी करू नये' हे त्यांचे यंदाचे उल्लेखनीय विनोदविशेष. पण ह्या सर्वाहूनही त्यांची 'दीपावली'तील 'वासांसी जीर्णानी' ही मृत्युशय्येवरच्या अखेरच्या क्षणांची आणि देहत्यागानंतरच्या आत्म्याच्या अवकाशसंचाराची मिस्किल कथा अधिक उजवी ठरेल.

रमेश मंत्री ह्यांची 'मनी नसें तें स्वप्नी दिसे' ही मानसोपचाराच्या प्रयोगावद्दलची 'मोहीनी'मधील कथा आणि विनोदमधील 'केली लढाई जाता जाता' त्यांच्या हुकुमी विनोदी लेखनशैलीची साक्ष देणाऱ्या आहेत. 'वीणा'मधील 'चंद्रावर मराठी लेखक' हा त्यांचा लेख मात्र निव्वळ जंत्रीच्या स्वरुपाचा झाला आहे. गेल्या वर्षी 'ललित'मध्ये त्यानी लिहिलेला मराठी टोपण नांवावरचा लेख किंवा गेल्या वर्षी आणि यंदाही 'ललित'मध्ये 'ठणठणपाळा'नी मराठी साहित्यिकांचा करून दिलेला परिचय हे ह्या प्रकारच्या मिस्किल व्यक्तिचित्रणात अधिक उजवे ठरतील.

जुन्या पठडीच्या विनोदी लेखकांपैकी शामराव ओक, कॅ. लिमये, वि. वि. बोकील व डॉ. अ. वा. वर्टी अजूनही त्याच हिरीरीने आणि रंगतीने लिहिताना पाहून त्यांच्या चाहत्यांस आनंद वाटावा. ओकांचे 'कॉप्टेवल खाशावाचे प्रेम प्रकरण,' कॅ. लिमये ह्यांची 'आलमगीर'मधील 'जो अफवावरी विश्वासला', वोकीलांची 'बुवा'मधील 'पसंत आहे मुलगी' आणि डॉ. वर्टींची 'हंस'मधील 'पांचवे लग्न' ह्या सर्व कथा ह्या मुरब्बी विनोदी लेखकांच्या मुरलेल्या शैलीतल्या आहेत.

द. पां. खांबेटे हे एक मार्मिक विनोदी लेखक आहेत. त्यांचे लेखन संयमशील पण मर्मभेदक असते. 'मोहिनी'मध्ये यंदा त्यांनी लिहिलेल्या 'व्यावसायिक लग्नपत्रिका' विशेष उल्लेखनीय आहेत. आपटे गुरुजींची मंगल प्रश्नपत्रिका, पत्रकारांची मंगल बातमी, नाटकाच्या ठेकेदाराची मंगल जाहिरात, कामगार पुढाऱ्यांचे मंगल आव्हान आणि वकिलाची मंगल नोटीस हे एकाच मंगल प्रसंगाचे विविध दृष्टीकोनातून केलेले आवाहन खांबेटयांच्या सूक्ष्म उपहासात्मक शैलीचा अपूर्व विलास प्रगट करते.

नरेंद्र बल्लाळानी यंदा दोन कथा लिहिल्या आहेत. त्यापैकी 'आवाज'मधील 'चंद्याचा काम्प्युटर. . .' ही कथा अधिक खेळकर व हास्यस्फोटक आहे. राजेंद्र बनहट्टी ह्यानी 'विनोद'मध्ये लिहिलेली 'शंभूरावाचे प्रेमप्रकरण' ही कथाही विशेष उल्लेखनीय वाटते. इंद्रायणी सावकारानीही यंदा अनेक कथा लिहिल्या आहेत—काही गंभीर आणि काही विनोदी. विनोदी कथांपैकी मोहिनीतील 'प्याद्याचा फर्जी' ही बनेल माणसांची कथा त्यांच्या खुमासदार लेखणीची आणि तंत्रशुद्ध रचनाचातुर्याची साक्ष देईलच.

क्वचित् पण दर्जेदार लेखन करणारे आणखी एक विनोदी लेखक म्हणजे श्री. राजाराम हुमण. स्त्री ही त्यांच्या उपहासाचा हुकमी विषय. 'शामसुंदर'मध्ये त्यानी यंदा ह्याच विषयावर मर्मभेदक लेख लिहिलेला आहे. 'बुवा'मधील 'मी एक मोठा माणूस' हा मोठेपणा प्राप्त कसा करावा ह्याची चिकित्सा करणारा मार्गदर्शक लेख वैशिष्ट्यपूर्ण व त्यांच्या कोटीबाज शैलीने नटलेला आहे. पण संगीतातले घराणे श्रेष्ठ की जात श्रेष्ठ ह्या मूलभूत प्रश्नाची पकड घेणारा व नावीदार ही काय चीज आहे ह्याचे जीतिवंत चित्रण उभे करणारा 'रत्नदीप'मधला त्यांचा लेख रसाळ, उपहासपूर्ण व शाब्दिक विनोदाचा निर्मळ नमुना म्हणून उल्लेखनीय वाटतो.

यंदाच्या दिवाळी अंकात विनोदी परिसंवाद आढळला फक्त 'दीपलक्ष्मीत'. 'तेथे पाहिजे जातीचे' ह्या शीर्षकाखाली काही निवडक जन्मजात मानवी नमुन्यांचा आठ ख्यातनाम विनोदी लेखकानी मार्मिक शब्दात परिचय करून दिला आहे. परिसंवादाची व्याप्ति नीट समजावून न दिली गेल्याकारणाने आपापल्या ज्ञातिविशेषाचा परिचय करून देताना जातीवरून व्यक्तीवर लक्ष केंद्रित केल्याचे आढळते. ह्यापैकी पु. रा. बेहऱ्यांचा 'मकल्या न्हावी', जयवंत दळवींचा 'सोन्या शिंपी', वसंत सबनीसांचा 'चांभार', बाळ सामंताचा 'सुतार', रमेश मंत्र्यांचा 'परीट' व राजाराम हुमण्यांचा 'सोनार' खरे जातिवंत व जिवंत वाटतात.

यंदाच्या दिवाळी अंकांतील उपर्युक्त गाळीव रत्ने हुडकून काढण्यासाठी एवढ्या अवाढव्य साहित्यसागरात अवगाहन करताना माझ्यासारख्या हौशी व रसिक वाचकाला किती हुडहुडी भरली असेल ह्याची कल्पना समदुःखी श्रोत्याना खचित येईलच. ह्या सर्व परिश्रमानंतर एवढे मात्र प्रत्ययाला आले आहे की नजरेस पडणारी सर्वच काही रत्ने नसतात. काही मणीही असतात तर काही दगडही. वरवर रत्ने वाटणारे काही भव्य व आकर्षक नमुने बऱ्याच घासाघिशीनंतर आणि कसानंतर किंचीतशा खड्यासारखेच ठरतात. मराठीतील विनोदी साहित्याची एकूण परिस्थिती सध्या गंभीर आहे असा निष्कर्ष काढला गेला तर तो चुकीचा खास ठरणार नाही. पु. ल. देशपांडे, आचार्य अत्रे, प्रा. मं. वि. राजाध्यक्ष, विजय तेंडूलकर, रांगणेकर, काणेकर ह्यांच्यासारखे कुवतीचे विनोदी लेखक अलिकडे स्थितप्रज्ञासारखे निर्विकार झाल्यामुळे आणि त्यांच्या अनुपस्थितीने निर्माण झालेली पोकळी भरून काढण्यास समर्थ व दर्जेदार लेखकांचा अभाव असल्यामुळे हा विनोदाचा बुडबुडा केव्हा फुटेल हे सांगता येणार नाही. वसंत सबनीसांसारखा सर्वत्र सारख्या कौशल्याने फटके मारणारा एखादाच गडी काय तो भरंवशाचा वाटतो. जयवंत दळवी, इंद्रायणी सावकार, शंकर पाटील, पु. भा. भावे ह्यांच्यासारख्या प्रभावी विनोदी लेखकांना विनोदाचा उबग आल्यामुळे की काय त्यांनी अधुनमधून गंभीर कथा लेखनाचाही प्रयोग केलेला दिसतो. ह्यामुळे त्यांच्या विनोदी वाङ्मयाच्या चाहत्यांची अनेक वेळा फसगत होते.

अलिकडे मासिकांची निर्मिती विपुल आणि कसदार विनोदी लेखक कमी असल्यामुळे दर्जेदार लेखकांवर फाजील ताण पडतो असे दिसते. कुणा संपादकाला नाराज करू नये म्हणून कसल्यातरी विषयावर त्रोटक अगर पाल्हाळीक लेखन कसेबसे हातावेगळे करण्याची प्रथितयश लेखकांची प्रवृत्ती त्यांच्या कीर्तीला साजेशी नाही, एवढे मात्र इथे नम्रपणे नमूद करावेसे वाटते.

यंदाच्या विनोदी साहित्याचे परीक्षण करताना माझी भूमिका उच्चभ्रू समीक्षकाची नसून एका रसिक हौशी वाचकाची आहे हे सांगणे प्राप्त आहे. हे सर्व साहित्य वाचल्यानंतर तो मनात चडफडेल किंवा खुषीने फुलेलही. तेच ते क्षण व श्रद्धास्थाने मी इथे प्रगटपणे दर्शविली आहेत. उण्याअधिकाचा राग सूज्ञांनी वरू नये ही विनंती.

●●●

अनुक्रमणिका

[पृष्ठ १५ वरून—याचल्या...]

"न्हाइतर काय ? मुडदा झाला म्हणुन काय वाट्टल ते करायचा परवाना मिळोला का काय त्येला ? शाण्या मुड्यावानी' गपचीप पडुन ऱ्हावावं अन् जे काय हुईल ते गुमान बघावं... त्ये दिलं सोडुन अन् ह्ये तर भलत्याच गमजा करायला बघतुया."

तिकडे तिरडीच्या भोवताली हा तमाशा रंगला होता आणि इकडे बाबुराव लाँड्रीवाला आणि तीन खांदेकरी चिता रचण्याच्या उद्योगास लगले होते. चितेची जागा मध्ये ठेवून दोघे एका बाजूला व दोघे दुसऱ्या बाजूला असे झोंकाड्या खात उभे होते. दोघानी लाकूडे आणून चितेच्या जागी टाकायचे आणि पलिकडच्या दोघानी ते नीटनेटके करायचे असा बहुधा त्यांचा बेत असावा. पण प्रत्यक्षात होत होते ते असे की दोघेजण एकेक लाकूड आणून चितेच्या जागी टाकीत होते आणि पलिकडले दोघेजण ते लाकूड उचलून आपल्या मागे फेकीत होते. आपण फार झपाट्याने चिता रचीत आहोत असा चौघांचाही ठाम भ्रम होता. पण चितेच्या जागी एकहि लाकूड नव्हते. चितेच्या आजुबाजूलाच लाकडे पसरलेली होती. आणून ठेवलेल्या लाकडांचा ढीग संपला तेव्हा प्रत्यक्ष चितेच्या जागी लाकडे नसल्याचे सत्य चिता रचणाऱ्यांच्या लक्षात आले. आत्ता स्वतःच्या हातानी रचलेली चित्ता क्षणात नाहीशी व्हावी याचे सर्वांनाच आश्चर्य वाटले. चौघेजणही छातीवर हात ठेवून चिता रचल्याचा निर्वाळा देत होते.



"आख्खी चिता गडप झाली—ही काय- भुताटकी म्हनायची का काय ?" गणपत कोळसेवाल्यानं भुताटकीचा प्रश्न काढल्यावरोवर सर्वजण थोडेसे दचकले. बघण्यात काही नजरचूक झाली असेल असे समजून प्रत्येकाने चितेची जागा हाताने चाचपून पाहिली. तरीही चिता हाताला लागली नाही. मग मात्र सगळ्यांची खात्री झाली की हा सर्व बावल्याचाच खेळ असला पाहिजे. नाहीतर एवढी मोठी रचलेली चित्ता नाहीशी होईलच कशी ? शिवाय बावल्याने स्मशानात येईपर्यंत अनेक प्रकारे त्रास दिला होता. तात्याच्या पायावरचा घाव अजूनही विव्हळत होता. पण चिता उधळून टाकण्यापर्यंत बावल्याची मजल जाईल असे मात्र कुणाला वाटले नव्हते.

"सालं भलतंच इरसाल दिसतंय. चितेची लाकडं लइ लांबवर फेकून दिल्याली दिसत्यात" असा सर्वांच्या वतीने गणपत कोळसेवाल्याने बावल्याबद्दलचा अभिप्राय व्यक्त केला आणि अधिक बंदोबस्ताने चिता रचली पाहिजे असे ठरविले. सर्वांच्या डोळ्यात दारूची धुंदी काठोकाठ भरली होती. अशा स्थितीत डोळ्यात तेल घालून चिता रचण्याचा निर्णय समितीने घेतला. जखमी झालेला तात्या सोडून इतर सर्वजण चिता रचण्याच्या कामास लागले. तेवढ्यात बाबुराव लाँड्रीवाल्याने इशारा दिला की, "पटापट लाकड रचा आणि झटकन् चिता पेटवा म्हणजे साल्याला गमज्या करायला सवड मिळायची नाही." शर्यत लागल्यासारखी मंडळी लटपटत्या पायानी भराभर लाकडे गोळा करून चिता रचू लागली या धावपळीत एकदोघे चितेतच कोसळले. दोघाना खरचटले. पण झटपट चिता रचण्याचे काम काही थांबले नाही. भराभर लाकूड आणायचे की चितेत टाकायचे. कार्याला तुफान वेग आला होता आणि त्या वेगातच दोघानी लाकूड समजून बावल्यालाच तिरडीवरून उचलून आणून चितेत रचला. तेवढ्यात इतरानी आणलेली लाकडे त्याच्यावर पडली. बावल्या चितेत गाडला गेला हे कुणाच्याच लक्षात आले नाही. लाकडे रचण्याचे काम वेगाने चालूच होते.

चिता पुरेशी उंच झाली असे सर्वांचे मत पडल्यानंतर मंडळी थांबली. "आता काय ताकद हाय साल्याची चितेला हात लावायची !" असं गणपत कोळसेवाला लढाई जिंकल्याच्या अभिमानानं म्हणाला. बावल्याला अखेरीस आपण हारवलं याचा आनंद सर्वांच्या चेहऱ्यावर दारूच्या धुंदीइतकाच तरळत होता. प्रत्येकानं पटापट बाजूला जाऊन बाटली तोंडाला लावून हा पहिला विजय साजरा केला. तरीही चिता जशीच्या तशीच होती.

"ठेवा आता साल्याला चितेवर" बाबूराव लाँड्रीवाल्यानं हुकूम दिला. मंडळी तिरडीपाशी आली. बघतात तो बावल्या तिरडीवर नाही. सगळ्याना विलक्षण धक्का बसला.

"आयला, ह्येनं तर कमालच केली आता ? भडवा तिरडी सोडुन पळाला म्हंजी काय म्हणावं ह्येला ?"

"मुड्द्यानं तिरडीवरनं निघुन जायचं म्हंजी. . . ."

"अरं जाउन जाउन ह्यो मुडदा जाइल कूटं ? मी मी म्हननारी

झिती मानसं आमच्या हातनं सुटली न्हाइत ततं ह्या मुड्याची काय कथा ?"

हे सर्व बोलणे चालले होते तरी तिरडीवरचा मुडदा गायब झाला याचे सर्वांना आश्चर्य तर वाटत होतेच पण थोडी भीतीही वाटू लागली होती. पण त्यावेळी भीति व्यक्त करणे नामर्दपणाचे झाले असते. प्रत्येकजण उसन्या बेडरपणे बोलत होता.

"ते थंडीनं काकडलं असंल आणि इथच कुठतरी वळचणीला जाऊन पडलं असंल" हे शिवराम शिप्याचे मत सर्वांना पटले. मंडळी तडक बावल्याच्या प्रेताचा शोध करू लागली. एक दोघानी तिरडी उचलून त्याखाली लपला नाही ना याची खात्री करून घेतली आणि स्मशानाचे कानेकोपरे धुंडाळण्यासाठी मंडळी पांगली. सगळीकडे शोध घेतला. पण बावल्या सापडला नाही. असे कधीही घडले नव्हते. सर्वांनी आपल्या प्रेतयात्रांच्या म्हणजे दुसऱ्यांच्या प्रेतयात्राना गेल्याच्या आठवणी तपासून पाहिल्या. पण असला विपरीत प्रकार कधीही झाला नव्हता. बावल्यानं कहर केला होता. वाटेत जड झाला, तात्याच्या पायावर कुदळ घातली, चिता उधळून टाकली आणि आता स्वतःचा मुडदाच गायब केला ! जगातल्या कुठल्याही प्रेताने इतका हलकटपणा केल्याची नोंद कुणाच्याही जवळ नव्हती.

"साल्याला शेवटी पळुनच जायचं होतं तर सगळयाना एवढा त्रास द्यायचं कारणच काय होतं ?" इति बाबुराव लाँड्रीवाला. कुणी काहीही म्हटलं तरी ही भलतीच आफत निर्माण झाली होती. लाँड्रीतून भारी कपडे गेले असते किंवा लग्नातून नवरामुलगा बेपत्ता झाला असता तरी एवढे आश्चर्य वाटले नसते. पण प्रेतयात्रेतून प्रेत नाहीसे व्हावे ही घटना अलौकिकच. तिकडे चिता बावल्याची एखाद्या उतावीळ प्रणयिनीसारखी वाट पहात होती. मंडळींच्या हाती एकच उपाय होता आणि तो म्हणजे बावल्याला न भूतो न भविष्यति अशा शिव्या देणे ! शिव्या आणि शोध दोन्हीही जारीने चालू होते. शोधणाऱ्या मंडळीतला एक खांदेकरी घरंगळत घरंगळत स्मशानाच्या प्रवेशद्वारातून बाहेर गेला. तिथे भिंतीच्या आडोश्याला भजन मंडळीच्या कृपेने बाटली चढवून निपचीत पडलेला भिकारी त्याला दिसला.

"अरं साल्या हतं येऊन पडलास व्हय ?" असं म्हणून बावल्या सापडल्याची आरोळी त्यानं ठोकली. सर्वजण उसळत्या उत्साहाने धडपडत धावत तिथे आले. सर्वांनी झुलत झुलत एकमेकाकडे पाहिले. बावल्याशिवाय इथं कुणी असणंच शक्य नाही याबद्दल सर्वांचे एकमत झाले. खांदेकऱ्यानी तडक त्याला उचलला. तो भिकारीही झोप आणि दारू यात इतका गडद बुडाला होता की त्याला आपल्याला उचलल्याचाही पत्ता लागला नाही. भिकाऱ्याला सक्त पहाऱ्यात आणून मंडळीनी तिरडीवर ठेवले. बाकीच्यानी चितेत पुन्हा काही गडबड झाली नाही ना याची खात्री करून घेतली. मग बाबुरावनं हुकूम दिला, "ठेवा साल्याला चितेवर." दोघाचौघानी त्या भिकाऱ्याला उचलले आणि चितेवर ठेवून दिले. भिकाऱ्याची झोप वा धुंदी यापैकी काहीच उडाले नव्हते. तोही मरणारून चितेवर पडून राहिला. नशीब एवढेच की लाकडे शिल्लक नसल्याने त्या भिकाऱ्याच्या अंगावर लाकडे टाकली नाहीत. पण हा 'बावल्या' आणखी काहीतरी इरसालपणा करायच्या आधी चिता पेटवून मोकळे झाले पाहिजे या विचाराने सर्वजण घाई करीत होते. शिवराम शिप्याने घाइघाईने रॉकेलचा डबा चितेवर ओतला आणि चितेच्या तळाला काडी लावली. चिता खालच्या बाजूने भडकताच भिकाऱ्याची झोप आणि धुंदी उडाली. तो ओरडू लागला. परंतु त्या तथाकथित 'प्रेता'ची कुणालाही दया येणे शक्य नव्हते. भिकाऱ्याची धुंदी उतरताच काय प्रकार आहे हे त्याच्या लक्षात आले आणि तो ताडकन् उठून बसला व उडी मारून चितेतून बाहेर पडून किंचाळत पळत सुटला.

त्याला चितेतून उडी मारून बाहेर पडताना पाहिल्याबरोबर सर्व मंडळीची धाबी दणाणली. बावल्या हा मानवयोनीतील नाही याची खात्री पटली. स्मशानातली ती भयाण शांतता आणि भडकत चाललेली चिता पाहून सर्वजण एकदम गप्प झाले. कुणाच्याही तोंडातून शब्द फुटेना. विस्फारलेल्या व भयग्रस्त डोळयानी सर्वजण आ वासून चितेकडे पहात होते. "अग बाय गा—ह्ये काइनरी भलतंच हाय बाबा..." असं कसेबसे म्हणून खांदेकरी मंडळी सुसाट पळत स्मशानाबाहेर पडली. त्यांची अवस्था पाहून बाबुराव लाँड्रीवाला, गणपत कोळसेवाला आणि शिवराम शिंपी यांच्याही छातीत धडकी भरली. आणि तात्या न्हाव्याचे अस्तित्व विसरून तेही सैरावैरा पळाले. स्मशानाबाहेर पडण्याची जणू त्यांच्यामध्ये शर्यतच लागली.

हा सर्व प्रकार पहात भीतीने दातखिळी बसलेला तात्या न्हावी जखमी झालेला पाय धरून वेड्यासारखा चितेकडे पहात होता आणि बावल्या निश्चित मनाने चितेमध्ये जळत होता.

•••

[पृष्ठ ८ वरुन]... अलिबागची सफर ]

"हा कोंकणातला रामजी शेतकरी. तो सडपातळ व काटक असतो. आणि स्वभावाने मनमिळाऊ असतो. डोकीस लहानसा रुमाल, कमरेला लंगोटी हा रामजीचा पोषाख. रामजी आपल्या शेतात नाचणी, वरी, सावा, कुळीथ ही पिके काढतो. पण त्याचे मुख्य पीक म्हणजे तांदळाचे."

"तर मग येताना दोन पोती तांदूळ आणा—" असा आतून आवाज आला.

"आणू– आणू—" आम्ही.

"कोंकणात माडाची झाडे असतात आणि त्यांस खूप नारळ—"

"असू दे! असू दे! आता जा आणि झोप! उद्या सकाळी निघायचंय." असे सांगून आम्ही नानूला वाटेला लावले. कारण 'खूप नारळ लागतात' असे एकले की "येताना दोन गोणी नारळहि आणा--" असा पुनः आतून आवाज यायचा.

दुसरे दिवशी आम्ही अलिबागेस पोचलो. तर भूगोलाने आम्हाला पहिला तडाखा दिला. हवा थंड होती. आणि कोंकणपट्टीत उन्हाळा फार म्हणून आमची बंडी मागे राहिली होती. पण आम्ही कशीबशी वेळ मारून नेली. आम्हा अहिंसक लोकाना किमान वेळ मारता येते म्हणून बरे!

अलिबागेत विष्णुपंत दांडेकरांचा पत्ता हुडकीत गेलो. तर दुसरा तडाखा. त्यांच्या घराला फोडता न येण्यासारखे जबरदस्त कुलूप (अथवा टाळे) होते. ते पाहून आम्ही सर्वजण चडफडलो. कारण दांडेकरांकडे उतरायचे आणि जेवायचे या हिशोबाने आम्ही काहीच आणले नव्हते. त्यामुळे ती टाळेबंदी आम्हा सर्वांना असह्य वाटली. काही वेळ तर आम्ही टाळे फोडण्याचेहि प्रयत्न केले. टाळे फोडण्यासाठी दगड आणावा, तर दगडच फुटतो असे बरेच वेळा झाले. ("कोंकणपट्टीतले दगड ठिसूळ असतात, असे भूगोलाच्या पुस्तकात नव्हते. काय हे आपले शिक्षण!"—नानूमामा.) शेवटी आम्हाला कुलूप फोडण्याचा नाद सोडून द्यावा लागला. यत्किंचित कुलूप फोडता येऊ नये, याचे सर्वांस अधिक वाईट वाटले. पण त्याना तसे वाटू नये म्हणून "दुसऱ्याच्या घराचे कुलूप फोडणे क्रिमिनल आहे!" असा एक लॉ–पॉईंट आम्ही समस्तांच्या निदर्शनास आणून दिला. त्या लॉ–पॉईंटचा आधार घेऊन दगड गोळा करणे सोडून दिले. न फुटणारे दगडहि कुठे दिसत नव्हते. तथापि अलिबागेला येण्याची वेळ दांडकरांना आगाऊ कळवली म्हणून सर्वांनी नानूमामांस दोष दिला.

घराच्या उघडया ओटयावरच पथाऱ्या टाकून आम्ही मुक्काम ठोकला. राखणदारीचे काय टाकळेवर टाकून आम्ही गाव बघायला बाहेर पडलो. एरव्ही टाकळेने राखणदारी करीत बसण्याचे मान्य केले नसते. पण टाळा–फोड मोहिमेत टाकळेच्या पायावरच दगड पडून त्याचा पाय फुटला होता.

गांवातून आम्ही सर्वजण मोकाटपण फिरलो. वाटेत नानूमामा सर्वांस अलिबागेची माहिती देत होता. (आधारः मराठी चौथीचा भूगोल.)

"हे नारळाचे झाड. यालाच माड असेहि म्हणतात. यास फांद्या नसतात. एकेका पेंडोस वीस ते पंचवीस एवढे नारळ लागतात."

"कां? शंभर सव्वाशे नारळ सुध्दा लागतात!" असे नावर म्हणाला.

"अशक्य!" नानूमामा ओरडला. कारण भुगोलाच्या पुस्तकात तेवढा मोठा आंकडा नव्हता.

"मी पाहिले आहेत." नावर ओरडला.

"मग ते माडाचे नव्हेत. ताडाचे ताडगोळे असतील."

"छे–छे!"

"अहो साहेब!–" नानूमामान एका अलिबागकराला अडवले आणि विचारले, "तुम्ही अलिबागचे ना?"

तो म्हणाला, "नाही!"

"मग आपण येथे काय करता?"

"नारळाचा धंदा!"

"वा:! मग तुम्ही सांगू शकाल. येथील माडाला किती नारळ लागतात."

"लागतात खूप! पण! लागताहेत कुठं?" असे तो कंटाळून म्हणाला आणि निघून गेला.

"झालं! खूप म्हणजेच शंभर सव्वाशे!" नावर म्हणाला.

"छे–छे! खूप म्हणजे वीस पंचवीस. फार तर तीस."

या वादात अर्थ नाही, म्हणून आम्ही विचारले, "हे कसले बरे पीक?"

नानू म्हणाला, "ही नाचणी पिकवली जात आहे." थोडे पुढे जातो तर तो म्हणाला, "हे वरीचे पीक." आणखी चार पावलांवर "हे साव्याचे पीक!" पुढल्या दहा पावलांवर हे कुळथाचे पीक!"

पण दुर्दैवाने एका शेतात एक माणूस दिसला. तो शतकरी असावा. तो म्हणाला, "हे सगळं मीरचीचं पीक!"

ते ऐकून नानूमामा चपापला. कारण आम्ही सर्वजण त्याच्या भूगोलाच्या ज्ञानाला खो खो हंसलो. नानूमामाच्या नाकाला मिरच्या फारच झोंबल्या.

रात्री परत आलो.

विष्णुपंत दांडेकरांकडे भोजन झोडता येईल म्हणून कोणी काही आणले नव्हते. त्यामुळे शनिवारी रात्री आणि रविवारी दुपारी बटाटा भाजी, पाव आणि केळी खाऊन गोरगरीबासारखी भूक मिटवावी लागली. ही भूक मिटवताना 'माझा प्रवास' पुस्तकातला पाठ झालेला उतारा नानूमामा पुनः पुनः म्हणून दाखवीत होता.

पुनः गाव फिरून पाहाण्याची कोणास इच्छा होईना. सारे जण बसून राहिले. त्रिंबक नाबराला तेवढी फिरण्याची इच्छा होती. कारण त्याला बसता येत नव्हते. त्याची टाइट-पँट होती. त्या पँटीमुळे त्याला पाय सोडून धड चालता सुद्धा येत नव्हते. मग मांडी घालून बसणे दूरच राहिले. तो बसावा आणि त्याच्या मांड्यातून टर्रर्र असा आवाज यावा म्हणून खूप प्रयत्न झाले.

अनुक्रमणिका






पण यश आले नाही. कुंभमेळ्यातील साधु-सुरखा तो उभाच राहिला.

तेवढ्यात आम्ही भुकेल्या आवाजात म्हटले, "अरे नानू येथे तांदूळ पिकतो ना?"

"भूगोलातल्या माहितीप्रमाणे पिकतो."

"तू भूगोल सोड! मिरची पिकते हे कुठं भुगोलात होतं?"

"तेहि खरं!"

"पण तांदूळ मिळत असला तर नेऊ दहा दहा किलो."

"ठीक-ठीक" असे म्हणून नानू कामाला लागला.

थोड्या वेळाने तांदूळ हजर झाला. सुदैवाने आपल्यापाशी पिशवी होती. आम्ही पिशवीत तांदळ घेतले. नानूने आपले तांदूळ (न नेसलेल्या) धोतरात बांधले. ओक आणि टाकळे यानी आपापल्या पँटीच्या पायाच्या पिशव्या केल्या आणि त्यात तांदूळ भरले. नावराच्या पँटीचे पाय खूपच चिंचोळे होते. दोन्ही पायात दोन किलो तांदूळ सुद्धा मावेनात. म्हणून त्याने टेरिलिनच्या शर्टात तांदूळ बांधले. (हा शर्ट आणि या पँटी अंगावरच्या नव्हेत!) बंदरावर जाण्यापुरती खाजगी मोटर भाड्यान घेतली. त्यात पाठीमागे सगळ्या पोतड्या लपवल्या आणि आम्ही निघालो.

वाटेत कुठेतरी आडमार्गाला मोटर थांबली.

"च्यामारी! मध्येच कुठं या पोलिसाचं चेकींग आलं?" असे ड्रायव्हर स्वतःशीच पुटपुटला.

"कसलं चेकींग?"

"तांदूळ बाहेर न्यायाला बंदी आहे, साहेब!"

आम्हा सर्वांची काळजं एकसाथ धडधडली. भात खाणे सोडा, हा पुढाऱ्यांचा उपदेश ऐकला असता तर हा प्रश्न उद्भवला नसता.

पोलिसाने गाडीत वाकून पाहिले आणि गाडीत काय आहे असे विचारले.

"आम्ही माणसे आहोत!" असे नानूने उत्तर दिले. आणि पोलीस हसेल म्हणून वाट पाहिली. पण पोलिस हसला नाही. उलट तो चिडला!

पोलीस पाठीमागे गेला आणि त्याने मोटरची डिकी उघडली, तर त्यात तांदळाच्या पिशव्या होत्या.

"हे काय आहे?"

आम्ही कोणीच उत्तर दिले नाही. तोंडात जिभा आहेत याचाच आम्हाला विसर पडला होता.

"हा तांदूळ कोणाचा ?"

आम्ही सर्वांनी एकमेकांच्या तोंडाकडे पाहिले. आणि वाचा गेल्यासारखे स्वस्थ बसून राहिलो. आमचा गंजीफ्रॉक तंग असल्यामुळे त्यावर काळजाचे ठोके ठक ठक वाजत होते.

"अरे, मी काय म्हणतोय? हा तांदूळ कोणाचा?"

तरी कुणी बोलेना. मोटरीतून कुणी खालीहि उतरेना.

तसा तो पुढे आला आणि म्हणाला, "काय राव, या पिशव्या तुमच्या?"

छे बुवा!" असे म्हणून आम्ही तात्काळ अंग झटकले.

"पिशवी, पँटी, धोतर, खमीस हे कुणाचं?"

"छे-छे! आमचं नव्हे!"

"टेरिलीन–" नावराने तोंड उघडताच आम्ही त्यावर हाताचा पंज्या दाबला.

"अस्सं! म्हणजे या तांदळाला मालक नाही." असे म्हणत पोलीस मागे गेला. आम्ही घाबरून गेलो. वाटले, आता हा पोलीस या पिशव्या कुणी आणल्या असे ड्रायव्हरला विचारील. पण त्याने तसे विचारले नाही. त्याने अत्यंत थंडपणाने साऱ्या पोतड्या खाली उतरून घेतल्या. इतका थंड पोलिस आम्ही जन्मात पाहिला नव्हता. पन्नास किलो तांदूळ !

"तांदूळ गेला खड्ड्यात! आमची पँट गेली". असे चिंतामणी कळवळून ओरडला.

त्याच्या तोंडावर हात ठेवून नानू पुटपुटला, "गप रे! आमचं धोतर गेलं त्याचं काय ? आख्खं पान ! तरी धोतरजोडी नव्हती म्हणून बरं!"

तेवढ्यात नानूने ड्रायव्हरला खूण केली. आणि हळूच त्याच्या कानात म्हटले, "पसे घेऊन प्रकरण मिटेल ?"

तो म्हणाला, "बघू ! द्या पंधरा रुपये !"

आम्ही सर्वांनी तावडतोब तीन तीन रुपये वर्गणी काढून पंधरा रुपये त्याच्या हातावर ठेवले.

ड्रायव्हर पाठीमागे गेला आणि काही तरी पुटपुटला.

... आला आणि म्हणाला, "पसे दिले. पण तो भडकलाय्!"

"कां?"

"कोणी लाच दिली म्हणून विचारतोय्?"

"कां ?"

"लाच देणं हाहि गुन्हा आहे म्हणतोय."

"मग आण ते पंधरा रुपये." नानू चिडला.

"ज्याने दिले त्यालाच न्यायला बोलवा म्हणतोय."

ते ऐकून आमची पांचावर धारण बसली. (आम्ही पाच जण म्हणून की काय कोण जाणे!) पंधरा रुपयासाठी लॉकपमध्ये कोण जाणार? म्हणून कोणी खाली उतरेना. नानू तर इतका घाबरला की "बाबा रे, पिटाळ तुझी मोटर! एकदा जाऊन बोटीत बसू!" असे तो ड्रायव्हरला म्हणाला.

ड्रायव्हरहि धाडसीच होता. तो मोटरीत बसला आणि त्याने वेगाने मोटर सुरु केली. आम्ही सर्वांनी चोरून पाहिले. पोलिस पाठलाग करतो आहे असे उगाच वाटले. तेवढ्यात "खाली वाका, खाली वाका" असे नानू म्हणाला. "त्याने मागून गोळीबार केला तर डोकी फुटायला नकोत!"

पण तसे काही झाले नाही. आम्ही ड्रायव्हरच्या धाडसाचे कौतुक केले.

ड्रायव्हर म्हणाला, "तुम्हाला वाचवण्यासाठी हे केलं! आता उद्या मला त्रास होईल. पोलिस ज्याम भडकलाय!"

त्यामुळे त्याच्या भाड्या व्यतिरिक्त आम्ही त्याला आणखी दहा रुपये दिले. आणि "काही त्रास झाला तर कळव ! आम्ही होम मिनिस्टराला भेटू !" असे त्याला आश्वासन देऊन कसेबसे बोटीत घुसलो.

"बोट सुरू करा–" असे ओक घाबरून ओरडला.

पण काही उपयोग झाला नाही. बोट उशिराच सुटली. पण ती सुटेपर्यंत आम्ही पोलीसाचा शोध घेत चौफेर बघत होतो.

शेवटी आमच्या नशिबाने बोट सुटली. बोट सुटताच नानू आमच्यावरच उलटला, "बिट्टू, हे तुझं कर्म ! तुझ्यामुळे माझं धोतर गेलं. तू तांदूळ घेऊ म्हणालास !"

"आमच्या पँटी गेल्या."

"माझा टेरिलीन शर्ट गेला." नावर उभाच होता.

मिनिस्टराकडे तक्रारी मांडाव्या तशा ते तक्रारी करू लागले. मिनिस्टर ऐकतात तसे सारे शांतपणे ऐकून घेतले. या कानातून त्या कानाकडे! विशेष म्हणजे आमची पिशवी गेली, त्याचे कुणालाच काही वाटले नाही!

तेवढ्यात शेजारी बसलेला एक माणूस म्हणाला, "काय झाले?"

तोच खुद्द पोलीस नाही याची आम्ही खात्री करून घेतली आणि घडलेली हकिकत कथन केली.

तर तो म्हणाला, "हा चौथा प्रकार!"

"कसला?"

"बनवाबनवीचा! येथून तांदूळ नेण्यावर अद्याप बंदी आलेली नाही. हे पहा खुद्द मी तीस किलो तांदूळ नेतो आहे." असे म्हणून त्याने धोतरात बांधलेला तांदूळ दाखवला. तेवढ्यात नानूने त्या धोतराची किनार बघून घेतली. पण हे धोतर नानूचे नव्हते.

मग आम्हा सर्वांचेच एकदम डोळे उघडले. एकदम लक्षात आले की पोलिसाचा पोषाख खाकी होता. पण त्याच्या डोकीवर टोपी नव्हती. पट्टा नव्हता कमरेला की बिल्ला नव्हता छातीवर!

नानू म्हणाला, "मी चोरून पाहात होतो. ड्रायव्हरने पंधरा रुपये स्वतःच्याच खिशात घातले होते."

"मग त्याच वेळी कां नाही बोललास?"

"अरे ती काय बोलायची वेळ होती? पोलिस खराच असता तर?"

"खरा पोलिस असेल कसा?"

"तेच म्हणतोय! स्काऊटमास्तर दिसत होता!"

"दांडेकरमास्तर नव्हते ना ते?"

"छे-छे! दांडेकर असते तर त्यानी आम्हाला ओळखलं असतं !"

तेवढ्यात नानूमामाची छाती तट्ट फुगली. तो एकदम प्रतिज्ञा केल्यासारखा बोलला, "चलो वापस! आपण पकडू त्याना. हरामखोर!"

"कसे पकडणार?"

"साखळी ओढा!"

"ही काय आगगाडी आहे?"

"का संडास आहे? सांखळी ओढा काय?"

आजूबाजूचे लोक खदाखदा हसले. त्यांचे काय जाते? तांदूळ गला आमचा.

"म्हणून मी म्हणालो होतो. या सफरीतून साध्य काय होणार?" ओक म्हणाला.

आणि धोतरासकट तांदूळ गेल्याचे दुःख विसरून नानूमामाने तो उतारा घडाघड म्हणायला सुरुवात केली, "तारुण्याच्या भरात, शक्तीच्या अमदानीत..." अशी सुरवात करून "...एखादा जिन्नस विसरणे, थोडीशी भामटचांची भीति असणे, वगरे प्रसंगी घडणाऱ्या गोष्टी प्रवासाच्या सुखात मिळून सुखरूपच होऊन जातात". असा त्याने शेवट केला.

बोट शांतपणे चालली होती.






काम कोणतेही असो—
त्यासाठीं योग्य
# डॉज आणि
# फार्गो
चासीस आहेतच.

फायर फायटर्स



स्नॉर्टो टॉवर्स



बसेस



ऑईल व गॅस टॅन्कर्स



डीलीव्हरी व्हॅनस् व ॲम्ब्युलॅन्सेस



५-टन ट्रक्स



ट्रॅक्टर फॉर ट्रेलर्स



कॉंक्रीट डम्प्स्टर्स



आपल्या दैनंदिन जीवनातील प्रत्येक क्षण या ना त्या रीतीने मोटर वाहतुकीवर अवलंबून असतो; आणि रोजच्या व्यवहारातील असो अथवा अन्य कोणतेही काम असो तेथे डॉज किंवा फार्गो ट्रक कार्यरत असतोच. अनंत वैचित्र्यांनी भरलेल्या मानवी जीवनात, भिन्न भिन्न गरजा अनेक पटींनी वाढल्यामुळे, निरनिराळ्या कामासाठीं निरनिराळ्या प्रकारच्या गाड्या हव्या असतात. वाहतुकीचा प्रकार कोणताही असो, त्या प्रकारासाठी योग्य अशी डॉज आणि फार्गो चासीस मिळत असल्यामुळे या बहुविध गरजा भागविण्याचे श्रेय त्यांनाच लाभत आहे.

PAL

दि प्रीमियर ऑटोमोबाइल्स लिमिटेड, मुंबई - ७०. SISTA'S-PAL-515 MA




## पद्मभूषण" पोतदार

**राज्यशासनानेच** एखाद्या माणसाचा गौरव केला म्हणजे तो 'मोठा' होतो वा 'महान' ठरतो अशी भाबडी श्रद्धा मी बाळगीत नाही. पण अशा गौरवाने आपल्या शासनाची रसिकता, गुणग्राहकता सिद्ध होऊन पर्यायाने आपल्या शासनाचाच गौरव होतो असेच मी मानतो. महाराष्ट्राचे एक थोर कर्मयोगी सुपुत्र महामहोपाध्याय **दत्तो वामन पोतदार** ह्यांचा प्रजासत्ताक दिनाच्या निमित्ताने भारतीयशासनाने जो गौरव केला आहे तो पाहिला की 'गौरवित' झाले असाच विचार मनात येऊन गेला. ऋषिमुनींच्या ह्या देशात अंगावर भस्माचे पट्टे ओढून, जटा वाढवून हिमालयाच्या शिखरांना आवाहन करूनच एखादी तपश्चर्या होऊ शकते ही कल्पना कधीच रुजली नाही. पुंडलिकाने मातापित्यांची सेवा हीच 'तपस्या' मानली आणि चंद्रभागेच्या तीरावरती विटेवरती परब्रह्म उभे केले. सावता माळयाने मळयाच्या मातीत ते 'मनोहर रूप' पाहिले. 'तपस्ये'ची निष्ठा महत्वाची. साधना महत्वाची. **दत्तो वामन पोतदार** ह्यांनी जीवनाच्या काही निष्ठा निश्चित केल्या. आणि नंतर त्यासाठी जीवनभर एकनिष्ठ 'साधना' केली. शिक्षण, ज्ञानोपासना, इतिहास, मराठी भाषा ह्यावाबत पोतदारांनी केलेले कार्य आज महाराष्ट्राला पूर्णत्या ज्ञात आहे. नूतन मराठी शाळा हे त्यांचे पहिले कार्यक्षेत्र. तिचे ते आजीव सदस्य झाले. शाळाप्रमुख म्हणून त्यांनी शाळेला फार मोठी प्रतिष्ठा मिळवून दिली. नंतर स. प. महाविद्यालयात ते प्राध्यापक झाले. एक लोकप्रिय व यशस्वी प्राध्यापक म्हणून पोतदारांनी तेथे कीर्ति संपादन केली त्यांच्या वागण्या–बोलण्यात आणि लिहिण्यातही एक आगळाच (खास पोतदारी) गोडवा आहे. आगळी सहजता आहे. अकृत्रिमता आहे. एक आगळाच झोक–नोक आहे. साधे सोपे पण खुसखुशित बोलण्यात पोतदारांची बरोबरी करणारे वक्ते थोडेच ! पोतदारांच्या बोलण्यात नर्म विनोद आहे. उपरोध आहे. प्रसंगी कठोर घणाघात करण्याचे सामर्थ्यही आहे. 'ताण' उत्पन्न झालेल्या सभेत पोतदारांना उभे करावे–सभा खुललीच म्हणून समजावे. शिक्षण आणि साहित्य हे पोतदारांचे आवडते विषय असले तरी पोतदार रंगतात ते इतिहासात! सुप्रसिद्ध इतिहास संशोधक कै. वि. कां. राजवाडे यांचे मार्गदर्शन त्यांना लाभले व त्यांच्या मागे पोतदार हे भारत इतिहास संशोधन मंडळाचे काम करू लागले. इतिहास म्हटला की 'जुना-पुराणा' संसार आलाच. पोतदारांनी स्वतः संसार केला नाही. पण हा इतिहासाचा "पुराणा" पण वैभवशाली संसार मात्र उभारला. जपला. इतिहास संशोधकांचा आधार व प्रेरणास्थान म्हणून आज अवघा महाराष्ट्र पोतदार यांना ओळखतो. इतिहास आणि मराठी साहित्य ह्या क्षेत्रातले अनेक बहुमान त्यांच्या पायाशी चालत आले. देशी–विदेशी सफरींची संधीही त्यांना मिळाली १९६१ साली त्यांच्या समाजसेवेबद्दल व शैक्षणिक तपस्येबद्दल राष्ट्रपतींनी सनद देऊन त्यांचा गौरव केला. पोतदार बहुभाषिक आहेत. संस्कृत, उर्दू, पर्शियन, हिंदी व इंग्रजीवर त्यांचे प्रभुत्व आहे. पुणे विद्यापीठाचे ते कुलगुरु होते. नॅशनल बुक ट्रस्टचे ते सदस्य आहेत पण हे सारे बहुमान स्वीकारूनही 'दत्तो वामन' ऋणमुक्त नाहीत. कारण महाराष्ट्र शासनाने त्यांच्यावर 'शिवचरित्रा'ची जबाबदारी सोपविली आहे, ती त्यांना पार पाडावयाची आहे. वयाच्या ७६ व्या वर्षीही त्यांचा उत्साह उदंड आहे. तपस्या चालू आहे. साधनारत वृत्ती कायम आहे. मन 'ताजे' आहे. शरीर व बुद्धीचा 'झोक' कायम आहे. निष्ठा अविचल आहेत. ते 'मूल्ये' मानतात. म्हणूनच काहीतरी 'अमोलिक' त्यांच्याकडून मिळेल अशी महाराष्ट्राला व देशालाही आशा वाटते. पद्मभूषण पोतदारांचे मी अभिनंदन करतो.

## "सागर सारंग" मिहीर सेन

तेनसिंगने एव्हरेस्ट सर केले तेव्हा अवघा भारत आनंदाने नाचला. भारतीय साहसवादाचा जयजयकार अवघ्या जगाने ऐकला. कलकत्त्याचा छत्तीस वर्षे वयाचा **बॅरिस्टर मिहीर सेन** ह्याने तर 'सप्त सागरांचे सम्राटपद' खेचून आणून भारतीय साहसाची कीर्ति त्रिखंडात दुमदुमून टाकली आहे.

बॅरिस्टर सेननी वयाच्या तेवीस-चोवीसाव्या वर्षी जिद्दीने सागरात उडी घेतली. मार्सेलिसची ती सुप्रसिद्ध उडी हे आपले प्रेरणास्थान होते अशी माहिती त्यांनी नुकत्याच झालेल्या सत्कारप्रसंगी दिली. सागराच्या लाटांवर सेनचे शरीरच नाचत नव्हते. त्यांच्या मनालाही गति मिळाली होती. त्यांनी सर्व सागरांची, त्यातल्या जलचरांची माहिती मिळविली. पाण्याचा अभ्यास केला. माहिती पूर्ण झाल्यावर त्यांनी १९६६ साली एकामागून एक विक्रम केले.

कलकत्त्याच्या डॉक्टर रमेशचंद्र सेन ह्यांचे मिहीर हे सुपुत्र. घरची सुस्थिति असल्याने सारे शिक्षण व्यवस्थित पार पडले. बॅरिस्टरीसाठी ते लंडनला गेले. ह्या काळात फक्त शिक्षण, अभ्यास हेच मिहीरचे ध्येय होते. साहसाची कुठलीही स्वप्ने त्यांनी पाहिली नव्हती. पण इंग्लंडमधल्या वास्तव्याने त्याचा वृत्तिपालट घडवून आणला. भारतीय साहसाने आपण जगाचे डोळे दिपवू अशी जिद्द मनात स्फुरली. आणि १९५५ साली इंग्लिश खाडी पोहून

जाण्याचा त्यानी पहिला प्रयत्न केला. पण शरीर दुबळे होते. पैसा नव्हता. सहकारी नव्हते. पाण्यात तासन् तास पोहता येण्यासाठी ताकद व चिकाटी येण्यासाठी लागणाऱ्या अन्नाची कल्पना त्यांना नव्हती. त्यामुळे प्रयत्न अयशस्वी झाला. पण अभ्यास आणि प्रयत्न चालूच राहिला. सहावेळा अपयश आले. पण अखेरीस २६–२७ सप्टेंबर १९५८ मध्ये इंग्लिश खाडी पोहून जाणारा पहिला भारतीय तरुण म्हणून त्यांनी कीर्ति संपादन केली.

त्यानंतर मात्र मिहीर सेन गेली आठ वर्षे फक्त वकिली व संसार करीत राहिले होते. पण मनातली साहसाची स्वप्ने त्यांना स्वस्थ बसू देत नव्हती. अखेरीस एप्रिल १९६६ मध्ये त्यांनी सीलोन-भारतामधली पाल्कची सामुद्रधुनी पोहून आपल्या स्वप्नपूर्तीच्या दिशेने पहिले पाऊल टाकले. पाल्कच्या सामुद्रधुनीत सर्प व शार्क मासे यांचे भय फार. पाण्याचा परिचय नाही अशा स्थितीत मिहीर सेन यांनी एक नवा विक्रम प्रस्थापित केला. नंतर त्यांनी आत्मविश्वासाने जिब्राल्टर, दार्दानेल्स व बास्फोरसच्या सामुद्रधुन्या पोहून पार केल्या. २४ ऑगस्ट १९६६ नंतर अवघ्या दीड महिन्यात त्यांनी ह्या तीन्ही सामुद्रधुन्या पार केल्या. त्यात त्याना यश मिळाले. आणि मग अवघ्या एक महिन्याच्या विश्रांतीने त्यांनी पनामा कालवाही पार केला. हा कालवा ४२ मैलांचा आहे. त्यासाठी त्यांना ३२॥ तास लागले. आता मिहीर सेन सुवेझचा कालवा पोहून जाण्याची स्वप्ने पहात आहेत. आजपर्यंत मिहीर सेन यांनी सहा हजार मैलांचे समुद्र-पर्यटन पोहून केले आहे. हा विक्रम वाटतो इतका सोपा खासच नाही. महाकठिण अशी ही तपस्या आहे. जलचर प्राण्यांचा त्रास, हवामान, पाण्याची विविध रूपे यावर मात करू शकणारा मनोनिग्रह मिहीर सेन यांजपाशी होता म्हणूनच त्यांना हे यश मिळाले आहे. कौटुंबिक सुख, वैयक्तिक दृष्टचा व्यावसायिक यश गाठीला असूनही मिहीर सेननी हे साहस केले, त्यामागे एकच भूमिका दिसते–भारतात साहसीवृत्ती वाढीस लागावी ही! त्यांची ही तळमळ लक्षात घेण्यासारखी आहे. आम्ही त्यांचे अभिनंदन करतो !

# अभिनंदन ! अभिनंदन !!

कला फुलतच असतात. ज्ञान विकसित होतच असते. गुणवत्ता वहरतच असते. बुद्धिमत्तेचा प्रकाश भोवतालचे तम नाहीसे करीत संचारतच असतो. क्रीडापटुत्व रसिकांचे दोन्ही हात जुळवून घेऊन टाळ्यांची दाद घेत वाढतच असते. नवे संशोधन जगाची जीवनावरची व मानवी प्रयत्नांवरची श्रद्धा वाढवीत अवतरतच असते. पण ह्या साऱ्या गोष्टींना जेव्हा सार्वत्रिक व शासकीय दाद मिळते तेव्हा त्या साऱ्या प्रयत्नांना एकदम सुवर्णस्पर्श होतो असे मला वाटते. 'दाद द्या' अशी भिक्षा कुठलीही कला, गुणवत्ता मागत फिरत नाही. पण ती दाद मिळाली तर त्या कलांचा मोगरा फुलतो. क्रीडा उत्साहाने संचारू लागतात. हेही नाकारण्यात अर्थ नाही.

भारतीय शासनाने प्रतिवर्षी २६ जानेवारीच्या प्रजासत्ताक दिनाच्या निमित्ताने अशी सार्वत्रिक व शासकीय "दाद" देण्याची पद्धत चालू ठेवली असून ती दाद विज्ञान, शिक्षण, लेखन, संगीत, समाजसेवा, क्रीडा इत्यादि क्षेत्रातील 'भारतकीर्ति' माणसांना दिली जात आहे. ह्यावर्षी पद्मविभूषण, पद्मभूषण, पद्मश्री इत्यादि किताबत देऊन शासनाने अनेकांचा गौरव केला आहे. ह्या मानकऱ्यात महाराष्ट्राचे सुप्रसिद्ध कवि **बा. भ. बोरकर** आहेत, संगीत दिग्दर्शक **वसंत देसाई** आहेत. महाराष्ट्राचे राज्यपाल चेरियन ह्यांच्या थोर समाजसेविका असलेल्या पत्नी श्रीमति **तारा चेरियन** आहेत. महाराष्ट्राच्या सहकारी क्षेत्रात स्वतःच्या कष्टाळू कर्तृत्वाने स्वयंभू स्थान उत्पन्न करून घेतलेले **वसंतराव दादा पाटील** हे आहेत, सुप्रसिद्ध नट, दिग्दर्शक व संस्कृत नाटकांचे कल्पक निर्माते **दाजी भाटवडेकर** आहेत. मराठी साहित्य, इतिहास, परंपरा यांचे थोर प्रवक्ते असे **दत्तो वामन पोतदार** आहेत. ह्यातला प्रत्येक माणूस स्वयंभू व स्वयंकीर्त आहे. त्यांचा परिचय करून देण्याची गरज नाही. त्यांना मिळालेला मान-सन्मान हा त्यांच्या दीर्घकालीन तपस्येचा गौरव आहे. बा. भ. बोरकर हे नाव गेली तीस पस्तीस वर्षे मराठी शारदेने मोठ्या अभिमानाने मिरवले आहे. बोरकरांची कविता हे तिने 'लेणे' मानले आहे. दाजी भाटवडेकरांचा '**काकाजी**' मराठी माणसाने इतका उंच नेऊन बसवला आहे की, त्यानंतर त्या 'ध्रुवपदा'वरून याला पदभ्रष्ट करणे कुणासही शक्य झालेले नाही. दाजींनी त्या भूमिकेचे अक्षरशः "सोने" केले आहे. संस्कृत नाटकांची 'निर्मिती' हे तर त्यांचे खास दालन. स्वच्छ वाणी, बोलका अभिनय, कलापूर्ण व रुबाबदार हालचाली. भूमिकेची समज ही दाजींची खास वैशिष्ट्ये! आज त्या गुणांचा गौरव झाला आहे. '**वसंत देसाई**' हे नाव केवळ चित्रपट रसिकांच्याच नव्हे तर आता नाट्य व अन्य रसिकांच्या चिरपरिचयाचे झाले आहे. वसंतरावांनी फार मोठमोठे 'संगीत' कार्यक्रमही सजविले-नटविले आहेत. मुलांचे, मुलींचे संयुक्त मोठे असे कार्यक्रम त्यांनी यशस्वीपणे सादर केले आहेत. वसंतराव रसिक मित्र आहेत. मोकळ्या मनाचा हा माणूस आहे. 'जगमित्र' आहे. **तारा चेरियन** ह्यांचा पिंड खऱ्या समाजसेवकाचा आहे. म्हणूनच त्या 'बंगल्या'पेक्षा दहा 'माणसा'तच जास्त दिसतात. शोभतातही! महाराष्ट्राच्या भावजीवनाशी त्या समरस झालेल्या आहेत. वसंत दादा पाटील हे 'सहकारी' चळवळीचे एक खंबीर आधारस्तंभ आहेत. सहकारी साखर कारखाने, बँका, मध्यवर्ती बँक यांच्याशी त्यांचे जवळचे नाते आहे. त्यात ते रंगतात. मानले जातात.

महाराष्ट्राच्या ह्या मानकऱ्यांबरोबरच आणखीही काही सुकीर्त व्यक्ति त्यात आहेत. सुप्रसिद्ध सरोदपटु **अलि अकबरखाँ**, ललित कला अकादमीचे अध्यक्ष व सुप्रसिद्ध लेखक-चिंतक **मुल्कराज आनंद**, सतारवादक **पंडित रविशंकर**, भारत भूषण टेनिसपटु **रामनाथन् कृष्णन**, भारताचा झुंजार क्रिकेटपटु (टायगर) **पतौडी**, सुप्रसिद्ध पार्श्वगायक **महंमद रफी**, भारताचा हॉकीपटु **शंकर लक्ष्मण**, **प्रिथीपालसिंग**' ह्या साऱ्यांचा गौरव भारत शासनाने केला आहे. पदव्या हा 'पूर्णविराम' नसतो. ती असते "प्रेरणा"! ती असते शासकीय मुखाने वदलेली भारतीय जनतेची जाहीर "दाद"! हे सारे मानकरी तशीच ती मानतील ह्याबद्दल मला तिळमात्र शंका नाही. त्यामुळेच कवि कविता करीत राहतील, गायक गात राहतील, रविशंकरांची सतार सुखवीत राहील. पतौडींचे "फटके" वाढतील. पुन्हा नवा 'काकाजी' दिसेल. कदाचित त्यातूनच कृष्णन् 'जगज्जेता' ठरेल. हे घडावे म्हणूनच ही प्रकट दाद! म्हणूनच हे **प्रकट अभिनंदन! नावें घेतली त्यांचे आणि नावे न घेतली त्यांचेही!**

**–आदित्य**




## वैनायक स्मरण

भारतीय स्वातंत्र्यलढ्यातील एक थोर सेनानी, क्रांतिकारकांचे अग्रदूत, महानवक्ते, महाकवि, मूलगामी समाजचिंतन मांडणारे व ते कार्यान्वित करणारे समाजसुधारक, सतत राष्ट्रचिंता वाहणारे आणि त्यासाठी प्रसंगी कठोर टीका सहन करूनही 'राष्ट्रहितच' बोलत राहणारे मंत्रद्रष्टे, वैयक्तिकाहून महत्तम असलेले राष्ट्रीसमर्पित जीवनच केवळ जगलेले एक "राष्ट्र-योगी" इत्यादि अनेक बिरुदांनी ज्यांचा गौरव करता येतो असे **विनायक दामोदर सावरकर** गतवर्षी फेब्रुवारीला आत्मार्पण करते झाले. यज्ञवेदीवरील एक समिधा, मृत्यूच्या मांडीवरील एक मानकरी ही भूमिका त्यांनी वयाच्या ब्यांशी-त्र्यांशी वर्षी पत्करली आणि प्रायोपवेशनाच्या मार्गाने मृत्यूच्या कुशीत शिरून ती पार पाडली. एका महान जीवन-नाट्याचा नाट्यपूर्ण पण धीरोदात्त शेवट झाला. एका 'महाकाव्या'चा अखेरचा 'सर्ग' लिहिला गेला तो गतवर्षीच्या फेब्रुवारी महिन्यात!

आज आपले राष्ट्र एका नाजुक अशा परिस्थितीतून जात आहे. अशा काळात प्रखर राष्ट्रनिष्ठेचा महान आदर्श डोळ्यांसमोर असणे अगत्याचे आहे असे मला वाटते. तो आदर्श सावरकरांचे अवघे जीवन देऊ शकेल.

म्हणून त्यांच्या पहिल्या पुण्यतिथीला त्यांचे स्मरण करून, अभिवादन करतो.

**तव स्मरण संतत स्फुरणदायी आम्हां घडो.**

## सार्वत्रिक निवडणुकीच्या निमित्ताने....

सार्वत्रिक निवडणुकीचे ढोल डिंडिम पिटले गेले. नगारे गरजले. शंख फुंकले गेले. आव्हाने दिली-घेतली गेली. पैजा लागल्या. सभांचा—पत्रकांचा—पदयात्रांचा—वृत्तपत्रीय शिवीगाळीचा—पाऊस पडला. 'राजकीय' निवडणुकीच्या निमित्ताने "वैयक्तिक" व "खाजगी" उणेदुणे काढून एकमेकांची 'खिल्ली' करण्याचा प्रयत्न झाला. पुढील पाच वर्षांत ज्याकडे "सोइस्कर डोळेझाक" करता येऊ शकेल अशी आश्वासने दिली—घेतली गेली! 'निधर्मी' राज्यात धर्म, जात, पोटजात, प्रांत-पोटप्रांत इत्यादि पद्धतीने आवाहने केली गेली. निवडणूक म्हटली की तडजोड, समझोते, सोयी पाहणे वगैरे आलेच. त्यानुसार संपूर्ण महाराष्ट्र समितीने 'मेनन' यांची 'लाल' सोय पाहिली आणि मेनन हे आपल्या नाकातले बाल असल्याचे सिद्ध केले. आणि त्यामुळे एक मोठा राजकीय 'विनोद' घडविला. जॉर्ज फर्नांडिस, मेनन आचार्य अत्रे वगैरे मंडळी एका व्यासपीठावर बसली. आणि मेनन—कम्युनिस्टांशी कधीही सूत नसलेल्या एस्. एम्. जोशांनी 'मेनन' ना पाठिंबा देऊन 'पुणेरी' मतदारांचा 'घुस्सा' पत्करला. कॉंग्रेस अंतर्गत मतभेदांमुळे जनकॉंग्रेस उभी राहिली. आणि अनेक असंतुष्ट आत्मे आव्हाने देत उभे ठाकले. कुणी किती 'धन' केले ह्याचा 'वयक्तिक' हिशोब जनतेला सादर झाला. चव्हाणांसारख्यांना नाशिकसारख्या, कोल्हापूरसारख्या ठिकाणी 'पडती' भाषा घेऊन अशा 'घरातल्या' शत्रूंच्या नाकदुऱ्या काढाव्या लागल्या. "ओळखीचा चोर जीवे मारी" म्हणतात तो असा. भुवनेश्वर येथे अशा ओळखीच्याच चोरांनी भारताच्या पंतप्रधानांवर अत्यंत घृणास्पद असा हल्ला केला आणि त्यांचे नाकाचे हाड त्यात पिचले. एक दातही दुखावला गेला. पटनाईक यांनी त्या निमित्ताने 'मेहतावां'चे काल्पनिक थडगे बांधून त्यावर "हे थडगे मी बांधिले असे"असा चिराही बसवून टाकला. भिंती रंगल्या. तोंडे रंगली, सभा रंगल्या. भाषणे रंगली. आणि काही ठिकाणी मारामाऱ्या दगडफेकींमुळे जमिनीही रंगल्या. आम्ही वृत्तीने अजूनही 'लाल' आहोत, रंगेल आहोत हे काही ठिकाणी सिद्ध झाले. पण ह्यातून लोकशाही 'हिरवळ' लेली नाही हेच सिद्ध झाले असे मला वाटते. पंतप्रधान इंदिराजींवरचा हल्ला हा तर महानिंद्यच म्हणावा लागेल. इंदिराजी ह्या आज एका पक्षाच्या उमेदवार वा प्रवक्त्या असल्या तरीही त्या ह्या खंडप्राय देशाच्या लोकनियुक्त पंतप्रधान आहेत. त्यांच्याशी कितीही मतभेद असले तरी त्यांची जनमानसातील व जगमानसातील प्रतिमा ही नेहमी अविच्छिन्न राहील याची काळजी प्रत्येक भारतीय नागरिकाने घेतली पाहिजे. हा अपमान इंदिरा गांधी ह्या व्यक्तीचा नाही. भारताच्या पंतप्रधानाचा व पर्यायाने भारतीय लोकशाहीचा आहे. लोकशाहीत कोणतेही मत वा कोणताही सिद्धांत 'अखेरचा' असत नाही ते मत वा तो सिद्धांत चुकीचा आहे हे पटवून देण्याचे व जनमत मानण्याचे स्वातंत्र्य लोकशाहीत गृहित धरलेले असते. ते स्वातंत्र्य उपयोगात आणण्याचे ऐवजी जर 'धोंडा-फेकी'ने प्रश्न सोडवायचे ठरविले तर भारतीय लोकशाही संपुष्टात येईल व यादवी माजेल. "आपण काय करीत आहोत"ह्याचा विचार प्रत्येक राजकीय पक्षाने करणे अगत्याचे आहे. सत्ताधारी पक्षाने सत्तेचा दुरुपयोग करून धाकदपटशा दाखवून मतप्रचार केल्याच्याही वार्ता आहेत. सरकारी यंत्रणेचा हा गैरवापरही तितकाच अनिष्ट आहे. ह्या निवडणुकांचे निकाल कसेही लागोत, भारतीय लोकशाहीवरील जन-



अनुक्रमणिका







तेची श्रद्धा ज्यामुळे वाढीस लागेल असेच वर्तन यापुढील काळात सर्व पक्षांच्या हातून घडणे अगत्याचे आहे. भोवती चीन–पाकिस्तानसारखी राष्ट्रे आपल्यावर वक्र दृष्टि ठेवून उभी आहेत. अशा काळात सुस्थिर, लोकशाही-निष्ठ, राष्ट्रैक्य महत्वाचे मानणारे भारतीय शासन दिल्ली-दरबारी असले पाहिजे. निवडणुकीपुरते "पक्ष"–नंतर फक्त "राष्ट्र" अणि "राष्ट्र"च ही श्रद्धा ह्या निवडणुकीतूनच वाढीस लागावी असे मला वाटते.

## जनमत कौल आणि नंतर

गोवा अखेर होता तिथेच राहिला. तो महाराष्ट्रात यावा म्हणून महाराष्ट्रवादी गोमंतक पक्ष व विशेषतः श्री. दयानंद बांदोडकर यांनी जीवाचे रान केले. पण युनायटेड गोवन्स आणि काँग्रेसमधली आंधळी फुटीर शक्ति यांच्या अनिष्ट युतीमुळे आणि महाराष्ट्र काँग्रेस नेत्यांच्या एकंदर औदासिन्यामुळे जनमत कौल विरुद्ध गेला. त्याबाबतीतले वादळ अजून पुरेसे शमलेले आहे असे दिसत नाही. बांदोडकर अजूनही धीर धरून आहेत. "अराष्ट्रीय शक्तींचे हे आव्हान आम्ही स्वीकारतो" अशी भूमिका त्यांनी घेतलेली आहे. गोव्याच्या सार्वत्रिक निवडणुकीची तयारीही आता सुरू झालेली आहेसे दिसते. येणाऱ्या वार्तांवरून काँग्रेस आणि यु. गोवन्स यांची युति आता जनमत कौलानंतर पक्की झालेली दिसते. गोव्याचा कौल विरुद्ध गेला आहे. त्याची सुस्पष्ट कारणमीमांसा होणे अगत्याचे आहे. "आज महाराष्ट्रात मराठी राज्य नसून मराठा राज्य चालू आहे" अशी चर्चा सर्वत्र चालू आहे. जिल्हापरिषदा, सहकारी चळवळ, साखर कारखाने, सहकारी बँकेचे कार्यक्षेत्र आणि सर्व प्रमुख पदावर 'जातिनिष्ट' दृष्टिकोनातून विचार केला जात आहे असे दिसते–बोलले जाते. कुळकायद्यांसारखे कायदे हे शेती उत्पादनाचे दृष्टीने अखेरीस अनुपकारक ठरले आहेत. एक मक्तेदारी संपविण्याची प्रतिज्ञा केली गेली. पण दुसरी कडु व कडवी मक्तेदारी आता सर्वच थैमान घालू लागते की काय अशी भीति उत्पन्न झाली आहे. सर्वत्र 'राजकीय' व 'जातीय' विचारांना प्राधान्य आले आहेसे दिसते आहे. अशा परिस्थितीत "गोव्याचा कौल" उभा होता. इतर 'आर्थिक' विचारही त्यात होता. भाषिक दृष्ट्या गोव्याने गेल्या तीन वर्षात 'मराठी'-बाबत पुष्कळच कार्य केलेले दिसते. पण अशा अशाश्वत परिस्थितीत महाराष्ट्रवादी कौल देणे कदाचित गोव्याला मानवले नसावे. महाराष्ट्र राज्यशासन व महाराष्ट्र काँग्रेस ह्यांनी केवळ गोव्यातल्या अराष्ट्रीय शक्तींना वा अज्ञानाला दूषण देऊन 'आत्मसंतुष्ट' वृत्तीने वागता कामा नये. आपल्या शासनाने जनमानसात जी भीति व जो अविश्वास उत्पन्न केला आहे तो दूर करणे हे अगत्याचे आहे असे मला वाटते. अखेर "दैवादत्तं कुले जन्म ! मदायत्तं तु पौरुषम्" ह्या भूमिकेने जातिवाचक विचारांपेक्षां 'पौरुषा' ला आवाहन करणारा नवा 'धर्म' व नवी 'नीति' अंगिकारणे आवश्यक आहे. 'राजकारण' हे साधन आहे. ते 'धर्म' बनू शकत नाही. अखेर "बहुतांचे कल्याण" हाच खरा 'धर्म' होऊ शकतो. तीच खरी 'नीति' होऊ शकते. गोव्याच्या कौलाने दिलेली नवी आव्हाने महाराष्ट्राने स्वीकारली पाहिजेत. निर्धाराने महाराष्ट्राचे राजकारण व सामाजिक व्यवहार सुधारले पाहिजेत. आंधळ्या आत्मसंतुष्टतेत अखेर विनाश आहे हे जाणले पाहिजे.

—सारस्वत

[ पृष्ठ १० वरून – नभोवाणीवर... ]

वापरली, तर त्याच्या असंतोषाचं एक कारण नाहीसं होईल, अशी माझी खात्री आहे.

**लेले:**– आजकालचे विद्यार्थी आणि त्यांचे पालक यांच्यात एक औपचारिकतेचा पडदा निर्माण झाला आहे.

**गोडे:**– मुंबईत उत्कृष्ट पडदे मिळण्याचं एकच ठिकाण. मॅस्वी आणि कंपनी, ठाकुरद्वार. खिडक्यांना, दारांना, किंवा कशालाहि पडदा हवा असेल, तर मॅस्वी आणि कंपनीतच घ्या.

**कोतेकर:**–पण हे कापडाच्या पडद्यावद्दल झालं, मिस्टर गोडे. चिकांचे उत्तम पडदे मात्र दादरला रानडे रस्त्यावर आंबेकर आणि मंडळींच्याकडेच मिळतात.

**लेले:**– बरं, मला वाटतं आता साडेनऊ मिनिटं झाली असून, आपली वेळ भरत आली.

**गोडे:**–घटका, पळे, तास, सेकंद बरोबर जाणून घेण्यासाठी 'टेमकर आणि कंपनीची'च घड्याळे घ्या.

**निवेदक:**–आताच आपण विद्यार्थ्यांतील अस्वस्थेवद्दल एक वोधप्रद परिसंवाद ऐकलात. यांत भाग घेणारे. वगैरे वगैरे.–

रेडिओवरील श्रुतिका ही आता सर्वांच्या परिचयाची झाली आहे. पण एक दशकानंतरच्या श्रुतिकेची ही झलक:

(आगगाडीचे स्टेशन. मधूनच गाडी सुरु झाल्याचा आणि शिट्टी वाजल्याचा आवाज)

**श्रीधरपंत:**–कोण? तू? इथं?

**विमलाबाई:**–होय. मी. इथं!

**श्रीधरपंत:**–आठवत का तुला? वीस वर्षापूर्वी आपलं भांडण झालं. नवरा-बायकोचं भांडण. नेहमीचंच, असं वाटलं तुला. पण मी त्या तिरमिरीत घरातून निघालो.

**विमलाबाई:**–आणि बेपत्ता झालात. तुम्ही कां घर सोडलंत, हे सांगायचं तरी होतं मला.

**श्रीधरपंत:**–कां? सांगतोच तर. माझ्या मनाप्रमाणं एकहि गोष्ट तू करीत नव्हतीस. मला शर्टाला सॅन्फोराईझ्ड कापड हवं होतं. पण तू हमखास माझ्यासाठी विनसॅन्सफोराईझ्ड कापड आणीत होतीस. ते कापड आटलं होतं. पंधरा दिवसात पायजम्याची चड्डी व्हायची.

**विमलाबाई:**–चुकलंच माझं. सॅन्स्फोराईझ्ड कापड गॅरंटीड असतं, आटत नाही हे माहीत नव्हतं. पण कापड आटलं; तरी माझी माया आटली का?

**श्रीधरपंत:**–माया आणि प्रेम असल्या फालतू गोष्टीवद्दल वोलू नकोस. पण माझ्या टेरेलिनच्या सुटाचं काय झालं ते सांग.

**विमलाबाई:**–हो तेहि चुकलच माझं. तुम्हाला कॅसल कंपनीचं सुरकत्या न पडणारं कापड सुटाला आणायला हवं होतं. त्याऐवजी मी कॉट्न आणलं.

**श्रीधरपंत:**–संसाराची घडी ही सुटाच्या घडीवर अवलंबून असते, हे कधीच लक्षात आलं नाही तुझ्या.

**विमलाबाई:**–आणि तुम्ही तरी माझी काय हौस पुरवलीत हां? मला हवं होतं पाँड्सचं फौंडेशनक्रीम. ते कधी आणलत का तुम्ही? अहो, पाँड्सचं फौंडेशन म्हणजे संसाराचा पाया. तोच जर नसेल, तर त्यावर पॉवडरचा कळस कसा चढणार?

**श्रीधरपंत:**–आता मात्र कळस झाला! अग, पण सांगायचं नाही का मला तेव्हाच? (पुनः आगगाडीच्या इंजिनचे आवाज– केवळ कंटिन्यूइटी राखण्यासाठी)

**विमलाबाई:**–त्यात काय सांगायचं? आणि लॅक्मे पावडर आणा म्हटलं, तर कुठली तरी हलकी पॉवडर घेऊन आलात ना? मॅक्सफॅक्टरची इंपोर्टेड लिप्स्टिक आणा, म्हणून मी हट्ट धरला तर तुम्ही बारा आण्याची देशी रंगीत कांडी घेऊन आलात. आम्हां बायकांचा जन्मच मेला वाईट हो. (धाय मोकलून रडू लागतात. आता आपण मराठी श्रुतिकाच एकतो आहोत, याबद्दल श्रोत्यांची खात्री पटते)

**श्रीधरपंत:**–उगी, उगी. अग हेच जर तू मला आधी सांगितलं असतस, तर वीस वर्षांचा मनस्ताप वाचला असता.

**विमलाबाई:**–पण मी मनस्ताप वांचवण्याचे कित्ती कित्ती उपाय करते आहे म्हटलं. रॉकेलच्या स्टोव्हऐवजी मी बरशेनचा गॅस वापरते.

**श्रीधरपंत:**–(आनंदाने) खरंच?

**विमलाबाई:**–आणि विजेचा जी. ई. सी. चा टोस्टर.

**श्रीधरपंत:**–अरे वा:!

**विमलाबाई:**–आणि सुश्राव्य संगीत ऐकण्यासाठी बुश रेडिओ ग्रॅम-टेलिव्हिजन सहित.

**श्रीधरपंत:**–छान! छान! छान! आता आपण पुन: संसार करू. मी तुला पाँड्सचं फौंडेशन आणीन आणि लॅक्मेची पॉवडर.

**विमलाबाई:**–शिवाय मॅक्स्फॅक्टर.

**श्रीधरपंत:**–हो. हो. फॅक्टरी.

**विमलाबाई:**–फॅक्टरी नव्हे हो, मॅक्सफॅक्टरची लिप्स्टिक.

**श्रीधरपंत:**–हो, हो, हो. आता पुन: आपण संसार करायचा. अगदी ए. सी. सी. च्या सीमेंटसारखा. पक्का. (दोघेहि हसतात, श्रुतिका संपते)

गांवकरी फड आणि कामगार–मंडळी ही 'मुकी बिचारी कुणी हांका' अशा श्रोत्यांची सदरे. खेड्यापाड्यात ग्रामपंचायतीना दिलेल्या रेडिओत एवढेच किंवा असेच कार्यक्रम ऐकू येण्याची हिकमत केलेली असते. या कार्यक्रमात दहा वर्षांनी साधारण अशी सुधारणा होईल.

(खेड्यातल्या शेतावर––)

**पवार मास्तर:**–काय पाटील, तुमची शेतीवाडी अगदी जोरदार फुलून आलीय्. काय केलं त्येसाठी ?

**पाटील:**–म्हंजे त्येचं काय झालं मास्तल सायेब, अवो पांच वर्सा आधी ह्या जिमिनींत ते पीकच येत न्हवतं बगा. मंग एक दिस काय झालं, ईश्वास इंजिनाचा येक रिप्रेझेंटिव्ह आला–

अनुक्रमणिका






**मास्तरः**–म्हणजे प्रतिनिधी म्हणा ना.

**पाटीलः**–काय वो म्हना त्येला. आमाला अडाणी मानसाला हेंच मराठी शबद कुठलं म्हाईत असायला मास्तर? तर काय पाळ बगा, त्यो ईश्वास इंजिनाचा सायेब लई चांगला. त्यो म्हनाली, तुला तगाईवर इंजिन देतो. दिलं आनि काय सांगायचं हो? धडाधड जंक्शन पीक यायला लागलं की हो?

**मास्तरः**–म्हणजे उत्तम पीक काढायचं तर विश्वास इंजनच वापरा, असं म्हणायचं आहे ना तुम्हाला?

**पाटीलः**–बरोबर. आणि बियाणं घ्यायचं, तर शेतकी अधिकारी, महाराष्ट्र सरकार ह्येंच्याकडनंच घ्या. आनि वरं का मास्तर त्ये युनायटेड स्टेट्स् ऑफ अमेरिकेच्या पीस कोअरचं व्हालेंटियर हायत ना–

(या पाटलाला इंग्रजी शब्दांचा उच्चार अगदीं अचूक येतो) त्येनीं वी लई हेल्प केली बगा.

**मास्तरः**–पण काय हो पाटील, तुमच्या शेतमालाला बाजार पेठ मिळवून द्यायची काय व्यवस्था केलीत तुम्ही?

**पाटीलः**–म्हंजे मार्केटिंग म्हना की:

**मास्तरः**–हां, हा.

**पाटीलः**–त्येचं काय हाय मास्तर, आमचं सगळं पीक बगा आम्ही स्टेट ॲग्रिकल्चरल फार्म मार्केटिंग कोऑपरेटिव्ह सोसायटीला—

**मास्तरः**–म्हणजे राज्य सहकारी संस्थेला.

**पाटीलः**–हां तुमच्या मराठी भाषंत असंच काय तरी म्हनत्यात बघा त्येला. त्या संव्स्थेत पीक घालतो म्हनून आमाला चांगला दर मिळतो.

**मास्तरः**–पण या शेतीसाठी खत घालीत असाल ना तुम्ही?

**पाटीलः**–व्हय तर. स्टेट ट्रेडिंग कार्पोरेशनकडून आमाला सिंद्री फर्टिलायझर फॅक्टरीची खतं मिळत्यात न्हवं का?

**मास्तरः**–बरं पाटील, कोंबड्यांनी अधिक अंडी घालावी म्हणून तुम्ही काय करता?

**पाटीलः**–त्येसाठी व्हय्? आमी सेतकी मंत्र्यांच्या भासनाची रेकॉर्ड आनली हाय. ती फोनोग्राफमंदी लावून कोंबड्यांच्या खुराड्यांत ठिवतो. ती भासनं ऐकून कोंबड्या देशासाठीं अधिक उत्पादन करत्यात.

**मास्तरः**–ही भाषणं फार परिणामकारक असतील नाही?

**पाटीलः**–म्हंजे काय? अवो खुळं का काय तुम्ही? मोस्ट इफेक्टिव्ह स्पीचीस कीं वो! अगदी जंक्शन.

**मास्तरः**–वाः वाः वाः पाटील साहेब, तुम्ही देशासाठी फारच मोठ कार्य करून राहिलेत. बरं, आता शाळेची वेळ झाली. पोलादे, पालेकर प्रकाशन संस्थेची क्रमिक पुस्तकं शिकवायला जायचं आहे ना शाळेत. नमस्ते.

महिला मंडळाचा कार्यक्रम. हा कार्यक्रम ऐकून महिला श्रोत्यांच्या सहनशीलतेबद्दल नितांत आदर वाटतो. या कार्यक्रमाची सुरुवात कोणत्या तरी ध्वनिमुद्रिकेने होते. दहा वर्षांनी हा कार्यक्रम असा होईलः सुरुवातीला 'दैव जाणिले कुणी?' असे गाणे ऐकू येईल. मधेच ते गाणे थांबवून निवेदिका म्हणेल, "भगिनींनो, दैव जाणिले कुणी? असा प्रश्न तुमच्यापुढे पडण्याचे मुळीच कारण नाही. कारण दैव जाणणारे होराभूषण केनवडे शास्त्री हे तुमचे भविष्य अचूक सांगतील. पोष्ट बॉक्स तीन चार चार चार पांच, जी. पी. ओ. मुंबई या पत्त्यावर पत्रव्यवहार करा."

आता यानंतर 'मी सासरी आले तेव्हा' या भाषण मालिकेत सौ. कुंदा भडसावळे यांचं भाषण ऐकाः सौ. भडसावळे (भाषण) मी प्रथम सासरी आले, तेव्हा मला खूप चुकल्या-चुकल्यासारखं झालं. कारण आमच्या माहेरी सारं खिरा कंपनीचं स्टीलचं फर्निचर होतं. म्हणून मी ह्यांना सांगून खिरा कंपनीचं आरशाचं कपाट आणि सोफा-सेट आणून घेतला. मग मला आमची खोली सुशोभीत करावी लागली. त्यासाठी मी चर्चगेट–स्ट्रीटवरील 'बॅलन्स इंटीरीयर डेकोरेटर्स' यांची नेमणूक केली. त्यांनी आमच्या खोलीचं जुनाट स्वरुप पालटून तिला एकदम अद्यावत् रूप दिलं. त्यानीं भिंतींना एशियाटिक पेंट्स दिले. खाली काश्मीरी गालिचे घातले. ते गालिचे ताजमहाल हॉटेलमागच्या काश्मीर पॅलेसमधून विकत घेतले. मग आमचे इंटीरियर–डेकोरेटर म्हणाले की आमचे हे जर अधून मधून दिवाणखान्यात कोपऱ्यातल्या खुर्चीवर पुस्तक वाचीत बसतील, तर त्या खोलीला विशेष शोभा येईल. म्हणून मी ह्यांना रोज दोन तास दिवाणखान्यात वाचत बसायला सांगितलं. अशा रीतीनं मी सासरी आले, तेव्हा मला घरात बऱ्याच सुधारणा कराव्या लागल्या."

निवेदिका : आताच आपण सौ. कुंदा भडसावळे यांचं 'मी सासरी आले तेव्हा' या विषयावरचं सुश्राव्य भाषण ऐकलंत. आता 'काटकसर' या विषयावर श्रीमती मृणालिनी फडके यांचं भाषण होईल. पण त्यापूर्वी **'नाच नाचुनी थकले रे मी नंदलाला'** ही ध्वनिमुद्रिका ऐकविण्यात येईल. (ध्वनिमुद्रिका अर्धीच झाल्यावर थांबते) भगिनींनो, राष्ट्रीय काटकसरीसाठी ही ध्वनिमुद्रिका संपूर्णपणे न वाजविता अर्धीच वाजविण्यात आली, हे तुमच्या लक्षात आलंच असेल. तर आता ऐका, श्रीमती मृणालिनी फडके—

श्रीमती फडके (भाषण) मी लहान होते, तेव्हा मला काटकसर म्हणजे काय ते कळत नव्हते. पण मी मोठी झाल्यावर मला काटकसरीचे महत्व कळू लागले. आता मी रात्रंदिवस काटकसर करीत असते. सकाळी मी महागडी परदेशी टूथ पेस्ट न लावता वानर छाप देशी पॉवडर लावून दांत घासते. मोठा डबा खूपच स्वस्त पडतो तुमच्या वाण्याला मोठा डबाच द्यायला सांगा. तोंड धुवून झाल्यावर मी बिनसाखरेचा चहा घेते. कारण त्यामुळं साखरेची बचत होते आणि माझं वजनहि वाढत नाही. नंतर मी ह्यांना कचेरीत पोचवायला स्वतः मोटार घेऊन जाते. ड्रायव्हरचा खर्च त्यामुळं वाचतो. भगिनीनो, मला वाटतं आपण प्रत्येकीनं आपल्या मोटारचा ड्रायव्हर



काढून स्वतःच मोटार चालवली, तर कित्ती भित्ती काटकसर होईल. तुम्हाला मोटार चालविता येत नसेल, तर जंजिरा मोटार ड्रायव्हिंग स्कूल, चर्नीरोड या संस्थेत नांव घाला. गेल्या आठवड्यातच मी मोटार चालवित असतो आमच्या मोटारीला अपघात होऊन मोटारीची साडे आठशे रुपयांची मोडतोड झाली. पण आमच्या मोटारीचा विमा उतरला असल्यानं आम्हाला सर्व पैसे मिळतील. म्हणून भगिनीनो तुम्हीहि 'कार पायलट इन्शुअरन्स कंपनीत'च तुमच्या मोटारींचा विमा उतरा. आणि अपघात झाल्यास तुमची मोटार 'ताडदेव मोटार रिपेअर्स' या वर्कशॉपमध्येच दुरुस्तीस टाका. बरं, आता काटकसर म्हणून मी माझं नऊ मिनिटाचं भाषण साडेचार मिनिटातच आटोपते. "जय काटकसर !"

दहा वर्षानंतरची 'आपली निवड' ऐका :

(ध्वनि मुद्रिका) **'लग्नाला जातो मी द्वारकापुरा**

(निवेदक) थांबा, पण लग्नाला जाण्यापूर्वी तुम्ही मंगलकार्यालय रिझर्व्ह केले आहे काय ? पुण्यांतील उत्कृष्ट मंगलकार्यालय– मांडववाले गोखले यांचे अमृत कार्यालय लक्षांत ठेवा. अमृत कार्यालय. अमृत कार्यालय. बनावट मालापासून सावध रहा. (ध्वनिमुद्रिका)

**'हृदयीं धरा हा बोध खरा ! संसारीं शांतिचा झरा'**

(निवेदक) संसारांतील झरा. म्हणजेच 'तुफान गेसर' एसी. डी. सी. वर चालणारा तुफान गेसर. पेशीवाले काका, गवालिया टँक.

(ध्वनिमुद्रिका) **उजाड झाला बाग सखे ग !**

(निवेदक) उत्तम बीं बियाणे वापरले, तर बाग उजाड होणार नाही. काका मिणचे यांची नर्सरी, वसई यांची उत्कृष्ट रोपे आणि बीं बियाणें.

(ध्वनि मुद्रिका) **सख्या साजणा, हौस जीवाची, कधी करायची पुरी**

(निवेदक) रुचकर पुरी आणि ताजे श्रीखंड यांसाठी मामा पाणंदीकर यांचे स्वच्छच स्वच्छच उपहार गृह, ठाकुरद्वार नाका, मुंबई नंबर दोन

(ध्वनिमुद्रिका) **एक धागाचा सुखाचा । शंभर धागे दुःखाचे**

(निवेदक) पण तुम्हाला सर्व धागे सुखाचेच हवे असतील, तर इमाम उद्दिन मोमिन यांची लाल धागा विडी वापरा. सर्वत्र मिळते. शंभराच्या बंडलावर दोन विड्या मोफत.

(ध्वनिमुद्रिका) **गुरुविण कोणी दाखविल वाट**

(निवेदक) एस्. एस्. सी. चा वाटाड्याच ही वाट दाखवील. उटसुटाकिया यांचे एस्. एस्. सी. गाईड वाचा. नापास झाल्यास निम्मे पैसे परत. सर्वत्र मिळते.

(ध्वनिमुद्रिका) **नाव गाव कशाला पुसता . . . .**
**मला हो म्हणतात लवंगी मिरची**

निवेदक : उत्तम मिरच्या, सुक्या, ओल्या, लालतिखट, मसाले मिळण्याचे एकमेव ठिकाण. पेडणेकर मसाले, आगर बाजार, मुंबई. आजच ऑर्डर नोंदवा.

(ध्वनिमुद्रिका) **अर्ध्या रात्री झोप मोडिशी—**

निवेदक : असा हा अर्ध्या रात्री झोप मोडणारा क्रूरकर्मा म्हणजे तुमचा कट्टर शत्रू डासच असणार. त्याचा बंदोबस्त करण्यासाठी वापरा—फ्लिटचा फवारा. क्षणात डासांचा नायनाट करा म्हणजे झोपमोड होणार नाही. श्रोते हो, आता हवामानाचा अंदाज आणि राष्ट्रगीत झाल्यावर आपली आजची पांचवी बैठक समाप्त होईल.

(हवामानाचा अंदाज) उद्या आकाश ढगाळ राहील. अधून मधून पाऊस पडेल. त्यापासून संरक्षण करण्यासाठी चित्ता छाप छत्र्या आणि डकबॅक रेन-कोट्स वापरा. त्यातूनहि पाऊस अंगावर पडला आणि सर्दी झालीच, तर व्हिक्सचे व्हेपोरब वापरा. त्यानेहि गुण आला नाही, तर थंडी-पडसे यांचे तज्ज्ञ डॉक्टर वी. डी. चिक्करमाने, रानडे रोड दादर याना भेटा. जाहिरातदाराना लिहिताना किंवा भेटताना रेडिओवर जाहिरात ऐकल्याचा उल्लेख करा. हवामानाचा अंदाज संपला. नमस्ते !

●●●

---

## साभार पोच

**व्होरा आणि कं., मुं. २**

**आचार्य चाणक्य**
अनु. भाऊ धर्माधिकारी
मूल्य २–५० रु.

**लिंडन जॉन्सन (जीवन दर्शन)**
अनु. अंबादास अग्निहोत्री
मूल्य २–५० रु.

**कृष्णप्रिया सत्यभामा**
ले. शामला शिरोळकर
मूल्य २–०० रु.

**चिन्मय हवकसूत्रे**
अनु. त्र्यं. कृ. टोपे
मूल्य २–०० रु.

**जिंकू किंवा मरूं**
अनु. भाऊ धर्माधिकारी
मूल्य २–०० रु.

**हे सारे मानवासाठी**
अनु. मंगेश पाडगांवकर
मूल्य २–५० रु.

**स्वातंत्र्याचे शूर शिपाई**
अनु. अं. शं. अग्निहोत्री
मूल्य ३–०० रु.

**लाडाची लढाई**
ले. डॉ. सरोजिनी बावर
मूल्य २–५० रु.

**अमेरिका माझे आशास्थान**
अनु. वसंतकुमार सराफ
मूल्य २–०० रु.

**फ्रान्सचा तारणहार–द गॉल**
ले. शि. शं. आपटे
मूल्य २–०० रु.

**वीर आणि परमवीर**
ले. सौ. मंगला अ. गाडगीळ
मूल्य २–०० रु.

**अभिनव प्रकाशन, मुं. १२**

**अमरशेखांची कविता**
ले. आचार्य माधव पोतदार
मूल्य ६–५० रु.

**व्हिएतनाम**
ले. सरला कारखानीस
मूल्य २–०० रु.

**तराईच्या जंगलांत**
भानू शिरधनकर
मूल्य ३–०० रु.